# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

अनुक्रमणिका




नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

वर्ष ६३ । अंक १० । जुलै २०१०
ज्येष्ठ – आषाढ शके १९३२
वार्षिक वर्गणी ३०० रूपये
या अंकाची किंमत रू. ३०/–

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.





संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका







# नवभारत

## जुलै २०१०

## अनुक्रमणिका

# संपादकीय निवेदन

राजकारण हे महाराष्ट्राचे पहिले वेड व नाटक हे दुसरे वेड आहे, असे काही वर्षांपूर्वी म्हटले जात असे. महाराष्ट्राचे तिसरे वेड कोणते, असा प्रश्न विचारल्यास 'इतिहास' हेच त्याचे उत्तर असेल. इतिहास व त्यातही छत्रपती महाराजांचे उज्ज्वल व प्रतापी चरित्र हा महाराष्ट्राच्या स्वत्वाचा अविभाज्य भाग आहे. त्यातून हल्लीच्या जागतिकीकरणाच्या काळात प्रत्येकच समाजाला व भाषिक गटाला आपले 'स्व'त्व कसे टिकवून धरायचे याची चिंता लागली आहे आणि त्यामुळे इतिहासाकडे वळून पाहाण्याची वृत्ती बळावत चालली आहे. शिवाजी महाराज, बाजीराव पेशवे, पानिपतचे युद्ध आणि अठराशे सत्तावन्नचे स्वातंत्र्यसमर ही सर्व मराठी समाजाची अभिमानस्थाने झाली आहेत याचे प्रत्यंतर आपणास रोजच्या अनुभवातून मिळत असते.

शंभर वर्षांपूर्वी महाराष्ट्रात अशीच, स्वत्व टिकते की जाते याची चिंता लागावी अशी, स्थिती होती. वंगभंगानंतर राष्ट्रीय चळवळीला उधाण आले होते. इंग्रजी साम्राज्यशाहीच्या विरोधात सुशिक्षित तरुणवर्ग पेटून उठला होता. लोकमान्य टिळकांच्या जहाल राजकारणाला अभिनव भारताच्या गुप्तचळवळीतून धगधगता पाठिंबा मिळत होता. अशा वेळी इंग्रज सरकारने भयंकर दडपशाही सुरू केली. टिळक तुरुंगात गेले, अनेक वर्तमानपत्रांकडून जामीन घेण्यात आले, पुष्कळ वर्तमानपत्रे बंद पडली, क्रांतिकारक फासावर लटकावले गेले, त्यांच्या अनुयायांचे हालहाल झाले. या सरकारी अत्याचारापुढे महाराष्ट्र निपचित पडतो की काय, अशी भीती विचारवंताना वाटू लागली. तेव्हा काही विचारवंतांनी आधीपासूनच चालत आलेल्या इतिहास-संशोधनाच्या उद्योगाला पद्धतशीर रूप द्यावे या मिषाने, पण राष्ट्रीय भावना जोपासण्याच्या हेतूने, भारत इतिहास संशोधक मंडळाची स्थापना केली. गेल्या शंभर वर्षांतील आपल्या कर्तृत्वाने मंडळ ही इतिहास संशोधनाच्या क्षेत्रातील अग्रगण्य संस्था झाली असून व विशेषतः महाराष्ट्राच्या इतिहासाविषयी ज्याला अभ्यास करावयाचा आहे असा जगाच्या पाठीवरील कोठल्याही देशातील संशोधक मंडळाला भेट दिल्यावाचून राहात नाही.

मराठी लोकांनी, महाराष्ट्र शासनाने आणि सर्वच इतिहास प्रेमींनी मंडळावर फार प्रेम केले आहे व मंडळाच्या कार्याविषयी आदरभाव राखला आहे. यंदा मंडळाची शताब्दी आहे. येत्या ७ जुलैला मंडळ त्याच्या हयातीच्या एकशे एकाव्या वर्षात पदार्पण करील. मंडळाच्या आयुष्यातील नव्या शतकातही त्याची भरभराट होतच राहील असा विश्वास आम्हाला वाटतो.

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या शताब्दीच्या निमित्ताने मंडळाविषयीचा आदर आणि आपुलकी व्यक्त करण्यासाठी आम्ही हा 'इतिहास-विशेषांक' काढला आहे. 'नवभारता'चा वाचक वर्ग त्याचे मनापासून स्वागत करील, अशी अपेक्षा आहे.

**— संपादक मंडळ**

## श्रद्धांजली

# प्रा. ग. प्र. प्रधान : एक विलोभनीय व्यक्तिमत्त्व



"लहान मुलांसाठी कविता लिहिणाऱ्या तुम्हा कवींची भूमिका ऑस्कर वाईल्डच्या कथेतील कोकिळेसारखी असली पाहिजे. बर्फाळ हिवाळयात गर्द तांबडे फूल यावे म्हणून त्या कोकिळेने गुलाबाच्या काट्यावर आपले हृदय टोचून धरले होते व त्या झाडाच्या मुळाशी रक्ताचा सडा घातला होता." प्रधानसर हे वाक्य अगदी सहजपणे बोलून गेले पण आम्हा विद्यार्थ्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. सरिता पदकी यांच्या एका बालकवितासंग्रहावर फर्ग्युसन महाविद्यालयातील 'साहित्य सहकार'मध्ये चर्चा होती व सर अध्यक्षपदावरून बोलत होते. सरांच्या प्रतिभेची ही किमया होती की, कोणताही विषय असो त्याला सहजपणे ते सोने चिकटवून जात.

एकोणिसशे पासष्ट साली भारत-पाकिस्तान युद्ध झाले. युद्ध संपल्यावर सरांनी काश्मीर सीमेला भेट दिली. हाजीपीर येथील पाकिस्तानी सैन्याची चौकी भारतीय सैन्याने जिंकून घेतली होती. चौकीवर भारतीय सैन्याने हल्ला केला तेव्हा पाकिस्तानी सैनिक बुद्धिबळ खेळत होते. पटावर मांडलेली मोहरी तशीच टाकून पाकिस्तानी सैनिक पळाले. सर त्या चौकीवर गेले तेव्हा त्या सोंगट्यांपैकी एक उचलून आणली. लहान मुलाच्या उल्हासाने ते ती सोंगटी दाखवत असत. अशी उत्स्फूर्ती त्यांच्या ठिकाणी होती. बांगला देशाला स्वातंत्र्य मिळाले तेव्हाही सर लगेचच बांगलादेशाला जाऊन आले. सुसज्ज पाकिस्तानी सैन्याशी नवथर मुक्तिवाहिनीने केलेल्या मुकाबल्याच्या हकीकती ते खुलवून सांगत असत.

पंचाहत्तर साली आणीबाणीची घोषणा झाली. प्रधानसर विधानपरिषदेत विरोधी-पक्षाचे नेते होते. इंदिराबाईंचे पंतप्रधानपद राहावे यासाठी एक घटना-दुरुस्ती सुचविण्यात आली. तिला राज्यांची मान्यता हवी होती, म्हणून महाराष्ट्राच्या विधिमंडळापुढे ती चर्चेला आली. सरांनी 'तडकून' भाषण केले. नंतर त्यांना अटकच करण्यात आली. तुरुंगात सरांनी 'भाकरी आणि स्वातंत्र्य' हे अप्रतिम पुस्तक लिहिले. असे प्रश्न उपस्थित झाले की, सर खवळून जात. भाकरीसाठी स्वातंत्र्य सोडावे, समृद्धीसाठी चारित्र्य गमवावे, फायद्यासाठी प्रामाणिकपणाशी फारकत घ्यावी अशा सारखे पर्याय कोणी मनात आणूच कसे शकतो, याचा त्यांना संताप वाटे.

सरांच्या मृत्यूनंतर त्यांच्या अनेक गुणांची उजळणी झाली. पण सरांनी प्राध्यापकांची चळवळ सुरू केली याचा उल्लेख झाला नाही. 'पुणे विद्यापीठ शिक्षक संघा'ची स्थापना प्रधानसरांनी केली व शेवटपर्यंत त्यांना या संघटनेविषयी अपार जिव्हाळा वाटत असे. संघटना म्हटली की लढे आले व लढे म्हटले की, संकटे आलीच. अशा संकटाच्या वेळी मतभेद झालेच पाहिजेत. अशा अडचणीत सरांकडे गेलो की, वडाच्या पारावर बसल्यागत गारवा वाटे. सर दोन्ही बाजूंना म्हणत, "मला शिव्या द्या आणि एकत्र व्हा बघू. ही वेळ भांडण्याची नाही."

'समाजवाद', 'साधना', 'स्वातंत्र्याची चळवळ' लोकमान्य 'टिळक' असे सरांच्या जिव्हाळयाचे खूप विषय होते. इतिहासाचार्य राजवाडे हा त्यापैकीच एक. राजवाड्यांच्या लेखाचा एक संग्रह त्यांनी साहित्य ॲकॅडेमीसाठी संपादित केला होता. अगदी म्हातारपणी त्यांनी कमलाबाई भागवतांच्याकडे एक बैठक बोलावून इतिहास मंडळातर्फे राजवाड्यांची पुण्यतिथी दरवर्षी साजरी व्हावी अशी व्यवस्था लावून दिली. स्वातंत्र्याच्या चळवळीचा साक्षेपी इतिहास त्यांनी लिहिला. आणि 'साधने'च्या संबंधात आलेला प्रत्येक जण त्यांना कुटुंबीयच वाटे ! टिळकांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने सरांनी व प्रा. अ. के. भागवतांनी मिळून इंग्रजीत टिळकांचे चरित्र लिहिले. त्याचा शेवट करताना सरांनी एक सुंदर परिच्छेद लिहिला आहे व टिळकांचे चरित्र व व्यक्तिमत्त्व ही मराठी संस्कृतीत अभिन्नपणे गुंफली गेली आहेत याचे मनोज्ञ वर्णन केले आहे.

सरांच्या ठिकाणी कोणताही आक्रमकपणा नव्हता; आग्रही-पणा नव्हता. "मला असे वाटते; तुला पाहिजे ते तू कर", असे सौजन्य होते. खरे तर आम्ही त्यांचे अंतेवासी त्यांना अनेक बाबतीत गृहीतच धरून चालत होतो अशी खंत मनात येते. कोपऱ्यात समई जळत असते; तिचा प्रकाश कायमचाच आहे असे आपण समजून चालतो. तेल संपल्यावर समई विझते आणि बाहेर व मनातही अंधार दाटून येतो.

☆☆☆



# 'मंडळ' स्थापनेची ऐतिहासिक पार्श्वभूमी

– डॉ. राजा दीक्षित

पुणे शहराविषयी महात्मा गांधींनी असे उद्गार काढले होते की, "ज्ञानसाधना आणि स्वार्थत्याग या बाबतीत पुण्याशी तुलना करता येईल असे दुसरे कोणतेही शहर हिंदुस्थानात नाही." पुण्याचे वर्णन 'निरलस कार्यकर्त्यांचे मोहोळ' या शब्दांतही त्यांनी केले होते. पुण्यातील गेल्या शे-दीडशे वर्षांतल्या संस्थात्मक जीवनावर नजर टाकली तर गांधीजींच्या उद्गारांमधले मर्म सहज उमजू शकेल. पुण्यातील एक महत्त्वाची सार्वजनिक संस्था म्हणजे 'भारत इतिहास संशोधक मंडळ.' मंडळाशेजारचे 'भरत नाट्यमंदिर' नाटकांच्या प्रयोगांमुळे सदैव गजबजलेले असते. केव्हातरी एखादे मोठे संमेलन वा विशेष समारंभ वगळता मंडळात मात्र अशी धामधूम दिसत नाही. अल्प उपस्थितीतील सभा-संमेलने आणि मंडळाच्या कट्ट्यावर रंगलेल्या इतिहासप्रेमींच्या गप्पा एवढीच काय ती गजबज तेथे आढळते; पण हजारो कागदपत्रांमध्ये दडलेले इतिहासाचे नाट्य मात्र अगदी शांतपणे तेथे अभ्यासले जाते. यंदा शताब्दीवर्षानिमित्ताने मात्र मंडळ खूपच गजबजले आहे.

पुण्याचे जे माहात्म्य याआधी नमूद केले आहे, ते इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे (१८६३-१९२६) यांनाही जाणवले होते. म्हणूनच मंडळाच्या स्थापनेसाठी त्यांनी पुण्याची निवड केली. १९२५ मध्ये लिहिलेल्या एका टिपणात ते म्हणतात, "मंडळ काढण्याचे शके १८२६ त मनात आल्यावर ते .... कोठे काढावे? बडोदा, इंदूर, ग्वाल्हेर, मिरज, बेळगाव, मुंबई, धुळे, नागपूर, अकोला, पुणे इत्यादी स्थळे तपासली. तेथे इतिहासाचे शोकी व वाली ... कोणी आहेत काय ते पाहिले व पुणे शहर पसंत केले. कारण शिक्षण, विद्वत्ता, समानशीलता, सहानुभूती, उत्साह, मंडळीकरणाची सवय इत्यादी गुण पुणे शहरातच सापडण्यासारखे होते. गणपतराव ... जोशी, साने, टिळक, गोखले, लिमये, भांडारकर वगैरे मंडळी येथे होती."[१]

पुण्याच्या या गुणवत्तेमुळे पुण्यात भारत इतिहास संशोधक मंडळ स्थापन झाले. मंडळाची स्थापना ७ जुलै १९१० या दिवशी, म्हणजे शके १८३२ च्या आषाढ शुद्ध प्रतिपदेला झाली. अप्पा बळवंत मेहेंदळे या पेशवाईतल्या सरदारांचा वाडा हे मंडळाचे जन्मस्थान होते. 'समाजाचे मंडळीकरण झाले पाहिजे' असा ध्यास बाळगणाऱ्या राजवाड्यांनी काही समविचारी मंडळींशी चर्चा करून इतिहास-मंडळाची योजना आखली. या योजनेला मूर्त स्वरूप येण्याच्या प्रसंगी उपस्थितांची संख्या मात्र अवघी दोन इतकी होती! त्यातील एक होते स्वत: राजवाडे, तर दुसरे होते सरदार खंडेराव चिंतामण मेहेंदळे. याप्रसंगी राजवाड्यांनी एक निबंध वाचला आणि मेहेंदळ्यांनी श्रोत्याची भूमिका बजावली. योजलेल्या कार्यात दिरंगाई नको म्हणून अवघ्या दोघांनीच एकत्र जमून संस्था स्थापण्याचा हा आशावादी प्रकारच मोठा ऐतिहासिक म्हटला पाहिजे.

एका विशिष्ट दिवशी दोन विशिष्ट व्यक्तींनी जरी मंडळ स्थापन केले, तरी या स्थापनेला दीर्घ सामाजिक-सांस्कृतिक पार्श्वभूमी[२] लाभलेली होती. ती लक्षात घेतली तर मंडळाची स्थापना ही आधुनिक भारताच्या व महाराष्ट्राच्या इतिहासातील एक अर्थपूर्ण घटना कशी होती, याची जाणीव होऊ शकते.

इतिहासाचार्य राजवाडे यांनी 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या त्यांच्या ग्रंथमालेच्या पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत एक महत्त्वपूर्ण वस्तुस्थिती नमूद केली होती. प्रस्तावनेच्या सुरुवातीलाच त्यांनी असे म्हटले की, "पूर्वजांच्या इतिहासाची आस्था महाराष्ट्रात अलीकडील तीस पस्तीस वर्षांत नव्याने झाली आहे."[३] यानंतर १९ व्या शतकातील महाराष्ट्रातल्या इतिहास-लेखन-संशोधनाचा संक्षिप्त आढावा घेऊन त्यांनी म्हटले, "येणेप्रमाणे साठपासष्टांत इतिहासाच्या आस्थेची जी एक लाट उसळली ती अजून म्हणजे १८९८ तही चढत्या प्रमाणावर आहे व पुढेही

अनुक्रमणिका

अशीच चढती राहिल असा तर्क आहे."[४]

इतिहासाच्या आस्थेच्या ज्या लाटेचा ठाशीव उल्लेख राजवाडे करतात, ती लाट आधुनिक महाराष्ट्राच्या (पर्यायाने भारताच्या) इतिहासासंदर्भात फार अर्थपूर्ण म्हटली पाहिजे. तिची अर्थवत्ता पाहण्यापूर्वी तिच्याविषयीचे निदान काही तपशील थोडक्यात विचारात घेऊ.

अठराशे साठोत्तरी काळ हा ललित व शास्त्रीय अशा दोन्ही प्रकारच्या ऐतिहासिक वाङ्मयनिर्मितीने गजबजलेला होता.[५] या वाङ्मयनिर्मितीच्या मुळाशी नव्या युगाच्या प्रेरणा होत्या. आधुनिक पद्धतशीर शास्त्रीय इतिहास–लेखन–संशोधनाचा परिचय आपल्याला ब्रिटिशांमुळे झाला. १९ व्या शतकाआधीच्या काळात पोवाडे, लावण्या, शकावल्या, कैफियती, बखरी, संतचरित्रे अशा रूपातले इतिहासलेखन आपल्याकडे होत होते. पण ते बरेचसे अनौपचारिक व अशास्त्रीय होते. ब्रिटिश अंमल प्रस्थापित झाल्यानंतर (१८१८) नव्या राज्यकर्त्यांद्वारे शास्त्रीय इतिहासलेखन महाराष्ट्रात अवतरले. पाश्चात्त्यांनी लिहिलेले इतिहास आणि शालेय व वरिष्ठ शैक्षणिक पातळीवर शिकवला जाणारा इतिहास, यांमुळे इंग्रजी शिक्षण घेणाऱ्या नवशिक्षितांना शास्त्रीय इतिहासाचा, तसेच इंग्रजीतील ऐतिहासिक ललित साहित्याचा परिचय घडू लागला. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रात इतिहास–लेखन सुरू झाले. पण तो काळ मुख्यतः पाश्चात्त्यांच्या प्रभावाचा आणि अनुकरणाचा होता.

ब्रिटिशांचे भारतावरील आक्रमण हे निव्वळ राजकीय नव्हे, तर आर्थिक आणि सांस्कृतिकसुद्धा होते. ब्रिटिशांनी भारतावर जसा राजकीय अंमल प्रस्थापित केला, तसेच आर्थिक वर्चस्व व सांस्कृतिक धुरीणत्वही (cultural hegemony) प्रस्थापित केले. 'रक्ताने व वर्णाने भारतीय, पण मते, आवडीनिवडी, नीतिमत्ता आणि बुद्धिमत्ता यांबाबत इंग्रजी वळणाचा' असा एक मध्यस्थांचा वर्ग ब्रिटिश राज्यकर्ते व भारतीय प्रजा यांमध्ये निर्माण करण्याची मेकॉलेची भाषा (१८३५) याचेच द्योतक होती.[६] स्वाभाविकपणे इतिहासाचे संशोधन व लेखन हा ब्रिटिशांसाठी शुद्ध ज्ञानप्राप्तीचा निरुपद्रवी उद्योग राहिला नाही, तर इतिहास हेसुद्धा त्यांनी वर्चस्वप्रस्थापनेचे एक हत्यार बनवले. एरवी ब्रिटिश प्रशासकांनी भारताच्या इतिहासात एवढा रस घेण्याचे कारण काय? तीन खंडांमध्ये मराठ्यांचा इतिहास (१८२६) लिहिणारा जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ आणि दोन खंडांमध्ये भारताचा इतिहास (१८४१) लिहिणारा माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन ही महाराष्ट्रातल्या अशा दोन ब्रिटिश प्रशासक–इतिहासकारांची (Administrator-historians) उदाहरणे होत. अशा इतिहासाचा प्रभाव महाराष्ट्रातील नवशिक्षितांच्या पहिल्या पिढ्यांवर पडला. किंबहुना या कालखंडाला म. म. दत्तो वामन पोतदार यांनी 'ग्रँट डफचे युग' म्हटले आहे, ते यथार्थच होय. परंतु अठराशे साठोत्तरी कालखंडात हा प्रभाव ओसरू लागला. तत्कालीन राष्ट्रवादाच्या प्रभावातून ऐतिहासिक कागदपत्रांचा शोध व अभ्यास सुरू झाला, परक्यांच्या इतिहासलेखनाची मीमांसा होऊ लागली आणि राष्ट्रवादी इतिहासलेखन उफाळून आले. राजवाडे म्हणतात ती 'आस्थेची लाट' हीच होय. महाराष्ट्रातील बुद्धिमंतांची इतिहासाची आस्था दोन मार्गांनी प्रकट झाली. एक मार्ग ऐतिहासिक ललित साहित्याचा होता, तर दुसरा ऐतिहासिक संशोधनावर आधारित लेखनाचा होता. सोयीसाठी त्यांना 'ललित इतिहास' (literary history) आणि 'शास्त्रीय इतिहास' (scientific history) म्हणता येईल. या दोन इतिहासांना पूरक असे इतिहास–विषयक उपक्रमही घडू लागले. त्यांमध्ये व्याख्याने, उत्सव व संस्थात्मक कार्य यांचा प्रामुख्याने समावेश करता येतो. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांवर का. ना. साने यांनी पुण्याच्या हिराबागेत दिलेली व्याख्याने (१८९६, जी 'केसरी'त सहा लेखांच्या रूपाने प्रकाशित झाली), लोकमान्य टिळकांनी सुरू केलेला शिवजयंतीचा उत्सव (१८९५) आणि शंकर श्रीकृष्ण देव यांनी धुळे येथे स्थापन केलेली 'सत्कार्योत्तेजक सभा' (१८९३) ही अशा उपक्रमांची तीन प्रातिनिधिक उदाहरणे होत. बडोद्याचे सयाजीराव गायकवाड यांच्यासारखे संस्थानिकही इतिहासप्रेमाला उत्तेजन देत होते. त्यांच्या उदार आश्रयामुळेच १८९० च्या दशकात 'राष्ट्रकथामाला' आणि 'महाराष्ट्र ग्रंथमाला' या ग्रंथमालिका प्रकाशित झाल्या.

अठराशे साठोत्तरी ललित इतिहासाची काही उदाहरणे पाहू. १८६१ मध्ये विनायक जनार्दन कीर्तनेलिखित 'थोरले माधवराव पेशवे' हे मराठीतील पहिले ऐतिहासिक नाटक

प्रसिद्ध झाले. १८६३ मध्ये प्रसिद्ध झालेला रा. ब. मोरोबा कान्होबा विजयकर यांचा 'घाशीराम कोतवाल' हा कथा-संग्रह म्हणजे मराठीतील पहिला ऐतिहासिक कथासंग्रह म्हणता येईल. १८७१ मध्ये रा. भि. गुंजीकरलिखित 'मोचनगड' ही मराठीतील पहिली ऐतिहासिक कादंबरी प्रसिद्ध झाली. लवकरच हा वाङ्मयप्रकार हरी नारायण तथा हरिभाऊ आपटे यांनी समृद्ध केला. त्यांच्या अकरा ऐतिहासिक कादंबऱ्यांपैकी सहा कादंबऱ्या मराठ्यांच्या इतिहासाविषयीच्या होत्या. १८६९ मध्ये छत्रपती शिवाजी महाराजांविषयीची दोन मोठी काव्ये पुढे आली – महात्मा जोतीबा फुले यांचा 'छत्रपती शिवाजी राजे भोसले यांचा पवाडा' आणि महादेव मोरेश्वर कुंटे यांचे 'राजा शिवाजी' हे खंडकाव्य. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात अनेकदा काव्यातून इतिहास डोकावताना आढळतो. 'जयाजीराव शिंदे आणि तुकोजीराव होळकर' (१८८६) आणि 'दोन बाजी' (१८९५) या केशवसुतांच्या कविता किंवा 'नारो-शंकराचे देवालय' (१९००) ही स्वातंत्र्यवीर सावरकरांची कविता उदाहरणादाखल सांगता येतील. सावरकरांच्या क्रांतिकार्याच्या या आरंभकालात 'सर्व पेशव्यांत थोर कोण व ते का?' (१९००) या शीर्षकाचा निबंधही त्यांनी लिहिल्याचे आढळते. ललित इतिहासाची अशी कितीतरी उदाहरणे त्या काळात दिसून येतात. शिवाजी महाराजांपासून पानिपतापर्यंतच्या, किंबहुना १८५७ च्या उठावापर्यंतच्या विविध ऐतिहासिक विषयांवरील कथासूत्रे घेऊन अनेक कथा, कादंबऱ्या, नाटके, काव्ये, निबंध व चरित्रे या काळात लिहिली गेली. या सर्व साहित्याचा हेतू केवळ ज्ञान व मनोरंजनाचाच नव्हता; तर राष्ट्रभावनेचा फैलाव करणे, स्वातंत्र्याकांक्षा उद्दीपित करणे या हेतूनेही ही साहित्यनिर्मिती झाल्याचे आढळते. ही सहेतुकता स्पष्ट करणारे एकच उदाहरण येथे नमुन्यादाखल पाहिले तरी पुरे. १८७१ मध्ये 'अफझलखानाच्या मृत्युचें नाटक' या आपल्या ललितकृतीच्या प्रस्तावनेत कोंडो सखाराम घाटे म्हणतात, "देश भरभराटीस येण्यास व देशबांधवांस सुखानुभव मिळण्यास कारण जो स्वदेशाभिमान त्याचा फैलाव होणे एकीकडे राहून त्याच्या उलट तो सर्वत्रांच्या अंतःकरणांतून नष्ट झाला असें म्हटलें तरी चालेल. याविषयी पुष्कळ उदाहरणे प्रसंगवशात् पाहण्यात येतात. आपले पूर्वज देशाच्या कल्याणाकरिता कसे झटत होते व त्यांचा हेतू सिद्धीस जाण्यास अश्रान्त श्रम करून त्यांनी काय काय त्रास सोसले, आणि आपल्या आयुष्याचा कसा सद्व्यय केला या गोष्टीचा विचार प्रत्येकाच्या अंतःकरणात सर्वकाल असणे जरूर आहे."[७]

शास्त्रीय इतिहासलेखनाच्या दृष्टीनेही अठराशे साठो-त्तरी काळ चांगलाच गजबजलेला होता. मराठीत १८०० ते १८७४ या काळात इतिहासविषयक ६१ ग्रंथ प्रकाशित झाले होते, तर १८७४ ते १९०० या (निबंधमालोत्तर) अवघ्या पाव शतकात ११० ग्रंथ प्रकाशित झाले. या आकडेवारीवरूनसुद्धा 'आस्थेच्या लाटे'ची कल्पना येऊ शकते. अर्थात ही वाढ जशी संख्यात्मक होती, तशी ती गुणात्मकही होती.

'वणवा सिद्धांत' मांडणाऱ्या डफकृत मराठ्यांच्या इतिहासावर १८६७ पासून एतद्देशीय प्रतिहल्ला सुरू झाला. या वर्षी डेक्कन कॉलेजचे विद्यार्थी असणाऱ्या नीलकंठ जनार्दन कीर्तने यांनी 'पूना यंग मेन्स असो-सिएशन'मध्ये एक निबंध वाचला. 'ग्रँट डफकृत मराठ्यांच्या बखरीवरील टीका' या शीर्षकाच्या या निबंधाद्वारे कीर्तने यांनी डफच्या इतिहासाच्या मर्यादा व चुका दर्शवणारी मीमांसा केली. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी १८७४ साली डफवर अधिकच जोरदार, पद्धतशीर व राष्ट्रवादी हल्ला चढवला. 'इतिहास' हा त्यांचा दीर्घ निबंध त्या साली त्यांच्या 'निबंधमाले'तून क्रमशः प्रसिद्ध झाला. या लेखात त्यांनी इतिहासाचा अर्थ व महत्त्व यांविषयी आणि ग्रीक व रोमनांच्या इतिहासलेखनशास्त्रीय कामगिरीविषयी चर्चा तर केलीच; पण इतिहास हे एक राष्ट्रवादी अस्त्रच बनवले. भारतातील इतिहासाच्या अनास्थेविषयी त्यांनी लिहिले. पूर्वग्रहदूषित परकीय इतिहासकार आणि वैफल्य-ग्रस्त ख्रिस्ती मिशनरी यांच्या इतिहासलेखनावर त्यांनी हल्ला चढवला. हे लेखन स्वार्थी, खोडसाळ, अन्याय-कारक व पोरकट असल्याचे त्यांनी नमूद केले. मिल, मेकॉले व मॉरिस हे तर शास्त्रीबुवांच्या हल्ल्याचे विशेष लक्ष्य ठरले. पाश्चात्त्य इतिहासलेखन आंधळेपणाने 'महा-प्रसाद' म्हणून स्वीकारण्याच्या एतद्देशीय प्रवृत्तीवरही त्यांनी टीका केली. इतिहासाची अनास्था सोडून देऊन ऐतिहासिक साधनांचा शोध घेण्याचे व आपला इतिहास

पुनर्रचित करण्याचे कळकळीचे आवाहन त्यांनी केले. शास्त्रीबुवांची एकूणच मांडणी स्वदेशाभिमानी, आशावादी व प्रेरक होती. आपल्या शब्दांना कृतीची जोड देण्यासाठी काशिनाथ नारायण साने आणि जनार्दन बाळाजी मोडक यांच्या साहाय्याने त्यांनी 'काव्येतिहाससंग्रह' हे मासिक सुरू केले. त्याच्या इतिहासविषयक विभागाचे काम मुख्यतः का. ना. सानेच पहात असत. या मासिकाने आपल्या ११ वर्षांच्या अस्तित्वकाळात (१८७८ ते १८८९) २५ बखरी, ५०१ मूळ कागदपत्रे वगैरे ६३०० पृष्ठांचा इतिहास-विषयक मजकूर प्रकाशित केला. त्यामुळे इतिहास-संशोधनास मोठी चालना मिळाली. त्याची सविस्तर कहाणी सांगणे येथे शक्य नाही; पण लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख, रामकृष्ण गोपाळ भांडारकर, कृ. त्र्यं. तेलंग, रघुनाथ भास्कर गोडबोले, बाळाजी प्रभाकर मोडक, राजारामशास्त्री भागवत, नारायण भगवान पावगी, वासुदेवशास्त्री खरे, दत्तात्रय बळवंत पारसनीस, शंकर श्रीकृष्ण देव, इ. विविध संशोधकांनी त्या काळात केलेली इतिहास-विषयक कामगिरी विशेष उल्लेखनीय म्हटली पाहिजे. या साऱ्याचा कळसाध्याय गाठला गेला तो १९ व्या शतकाअखेरीस.

१८९७ ते १९०० या सुमारे चार वर्षांच्या काळात राजवाडे म्हणतात ती इतिहासाच्या आस्थेची लाट तीव्रतेने उफाळून आली आणि इतिहास-विषयक तीन पायाभूत ग्रंथ व वाङ्मयेतिहासविषयक पाच पायाभूत प्रकल्प या अवधीतच निर्माण झाले. गोविंद सखाराम सरदेसाई यांच्या 'रियासत' ग्रंथमालेतील पहिला खंड ('मुसलमानी रियासत') आणि वि. का. राजवाडे यांच्या 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या बावीस-खंडी ग्रंथमालेतील पहिला खंड १८९८ या एकाच वर्षी प्रकाशित झाला. त्यापाठोपाठ १९०० साली न्या. महादेव गोविंद रानडे यांचा 'Rise of the Maratha Power' हा ग्रंथ प्रकाशित झाला. या तीन ग्रंथांमुळे महाराष्ट्रात आधुनिक व शास्त्रीय इतिहासलेखनाचा खऱ्या अर्थाने पाया घातला गेला. या तीन ग्रंथांची वैशिष्ट्ये जरी भिन्न भिन्न असली, तरी त्या तिन्हींच्या पायाभूत कामगिरीची एकत्रितपणे दखल घ्यावी लागते. न्या. म. गो. रानडे (इंग्रजीत), ल. रा. पांगारकर, ग. ज. आगाशे, मोती बुलासा आणि वि. ल. भावे या प्रत्येकाने स्वतंत्रपणे केलेले मराठी वाङ्मयेतिहास-विषयक पायाभूत लेखन हे १८९८ या एकाच वर्षातील आहे.[८] जुन्या मराठी किल्ल्यांवरील उपेक्षित कागदपत्रे अभ्यासण्या-बाबत कवी केशवसुत यांनी 'नैर्ऋत्येकडला वारा' या कवितेत महत्त्वपूर्ण आवाहन केले तेही १८९७-९८ मध्येच. या कवितेत केशवसुत म्हणतात :

"त्यांचे उंच शिरांवरी विलसती किल्ले मराठी जुने,
देवी पालक त्यांतल्या मज पुनः धिक्कारती भाषणें!
"कोठे पूर्वज वीर धीर तव! तूं कोणीकडे पामरा!
ये येथें इतिहासपत्र पडके वाचूनि पाहीं जरा!""[९]

हे आवाहन म्हणजे निव्वळ एक कविकल्पना नसून तत्कालीन महाराष्ट्रातील बुद्धिमंतांची ती प्रातिनिधिक हाक म्हणता येईल. १८९८ या वर्षाच्या आसपास घडलेल्या या व अन्य अनेक इतिहास-विषयक घटनांचा नेमका अन्वयार्थ लावणे आवश्यक आहे. त्या दृष्टीने असे म्हणता येईल की, या सर्वाला केवळ ऐतिहासिक अपघात मानून चालणार नाही. या सर्व वैचारिक व सांस्कृतिक घडामोडी म्हणजे मराठी स्वत्वाचा ठोस आविष्कार होता. राष्ट्रीय जागृतीने व तिला पूरक अशा प्रादेशिक अस्मितेने प्रभावित झालेल्या महाराष्ट्रीय विचारवंतांनी ब्रिटिशांच्या सांस्कृतिक प्रभुत्वाविरूद्धची पर्यायी वैचारिक मांडणी आरंभली होती. केवळ राजकीय-आर्थिक गुलामी नव्हे, तर सांस्कृतिक गुलामीसुद्धा नष्ट करण्यासाठी हे विचारवंत आपल्या निश्चयाचे बळ एकवटू लागले होते. कोणतेही सत्ताधारी सक्ती आणि संमती अशा दुहेरी मार्गाने प्रभुत्व निर्माण करतात. खुबीने आपली संस्कृती लादून लोकांची मानसिकता बदलली की, राज्यकर्त्यांचे प्रभुत्व लोक मूकपणे स्वीकारतात. ब्रिटिशांनी या प्रकारचे सांस्कृतिक आक्रमण आपल्यावर केले होते. त्याविरुद्धचे सांस्कृतिक भूमिका-युद्ध (War of position) पुकारून लोकमानस चेतवल्याशिवाय राजकीय लढ्याला बळ मिळणार नव्हते. महाराष्ट्रातील धुरिणांनी असे भूमिका-युद्ध पुकारले. हे भूमिकायुद्ध म्हणजे १९ व्या शतकातल्या महाराष्ट्रातील व्यापक राष्ट्रवादाचे प्रभावी फलित होते.

महाराष्ट्रातील तेव्हाचा राष्ट्रवाद हा राष्ट्रीय अस्मिता व प्रादेशिक अस्मिता या दोहोंना महत्त्व देणारा आणि त्यांचा मेळ साधणारा होता. द. ब. पारसनीस यांच्या

'महाराष्ट्रकोकिळ' (१८८५-९२) आणि 'भारतवर्ष' (१८९६-९९) या दोन इतिहास-विषयक नियतकालिकांच्या नावांवरूनही हा मेळ दिसून येतो. शिवजयंती उत्सवाबाबत टिळकांचे पुढील उद्‌गार अर्थपूर्ण आहेत - "... राष्ट्रातील महापुरुषांचे स्मरण हे राष्ट्रीयत्व कायम राखण्यास एक चांगले साधन आहे. एकराष्ट्रीयत्व म्हणजे काही दृश्य पदार्थ नव्हे, ही एक प्रकारची कल्पना असून ती सतत जागृत ठेविली तरच ती टिकण्यासारखी आहे व ज्या ज्या राष्ट्रांनी ती कायम राखली आहे, त्यांनी आपल्या ऐतिहासिक थोर पुरुषांच्या इतिहासाची या कामी योग्य मदत घेतली असे थोड्या विचारांती कोणाच्याही लक्षात येईल."[१०] इतिहासाचार्य राजवाडे यांनी पुढे आपल्या अकराव्या खंडात एक विधान केले. तेही फार अर्थपूर्ण आहे. ते विधान पुढीलप्रमाणे - "असो. राजे निजले आहेत, जहागीरदार डुलक्या घेत आहेत, आणि इनामदार झोपा काढीत आहेत. ते जागे होई तावत्कालपर्यंत, जागे झालेले मध्यम स्थितीतील जे आपण, त्यांनी राष्ट्राच्या या पितरांचे स्मरण कायम ठेविले पाहिजे. आपले सामर्थ्य यद्यपि जुजबी आहे, तत्रापि ह्या पुण्यकर्माच्या प्रीत्यर्थ ते खर्चिले पाहिजे."[११] राजवाडे ज्याला 'पुण्यकर्म' म्हणतात तेच तत्कालीन महाराष्ट्रातील मध्यमवर्गीयांचे 'वर्गकर्म' होते, असे म्हणता येईल.

१९२५ सालच्या टिपणात 'मंडळ' स्थापनेची चर्चा करताना राजवाडे यांनी असे नमूद केले होते की, "मराठ्यांच्या इतिहासाचे संशोधन शास्त्रीयरित्या केले असता काय समजून येईल - इंग्रजाने सर्वस्व हरण केले पापबुद्धीने हे समजून येईल - स्वतःच्या गतचरित्रातील गुण व अवगुण कळून येतील. स्वसमाजाचे पृथक्करण ध्यानात येईल व त्याचा उपयोग वर्तमान राजकारणी पुरुषांना अवश्य होईल. पण हा फायदा केव्हा होईल? जर संस्था सरकारची, संस्थानिकांची किंवा व्यक्तींची मिंधी राहाणार नाही तर. देशात शाळा, कचेऱ्या, नोकऱ्या लोकांना विराष्ट्रीय करीत आहेत. अशांच्या पुढे हा इतिहास ठेवावयाचा आहे."[१२]

या साऱ्या पार्श्वभूमीवर 'भारत इतिहास संशोधक मंडळा'ची स्थापना झाली. राजवाडे (व त्यांचे सहकारी) हे इतिहासाचे निव्वळ अभ्यासक नसून ते जाज्ज्वल्य राष्ट्रभक्त आणि समाजहितवादी होते. इतिहासाच्या आस्थेची लाट विरू न देता तिला संस्थात्मक रूप देण्याची त्यांची धडपड होती. एकंदरीतच राजवाडे हे 'मंडळीकरण' वादी[१३] होते.

मंडळाच्या स्थापनेची निकड राजवाडे यांना किती जाणवली होती, हे मंडळाच्या तृतीय संमेलनप्रसंगी (१९१३) त्यांनी काढलेल्या उद्‌गारांवरून दिसून येते : "आम्हा प्रत्येकास कागदपत्रे हुडकून काढण्यापासून तो पुस्तके विकून पैसे वसूल करीपर्यंतच्या सर्व विवंचना कराव्या लागल्या आहेत. यामुळे वेळेचा कितीतरी अपव्यय होतो व प्रगती तर अति मंदगतीने होते. तेव्हा आपला झाला, परंतु आपल्या पाठीमागून जे गृहस्थ हे कार्य करण्यास प्रवृत्त होतील त्यांच्या काळाचा अपव्यव होऊन आयुष्य फुकट जाऊ नये व कार्य तर त्वरित व्हावे अशासाठी काय योजना निर्माण करावी अशा विंचनेत मी असताना माझी व तात्यासाहेब मेहेंदळे यांची गाठ पडली व चमत्कार असा की त्यांनी होऊन मला विचारले की संघटित स्वरूपाने काम करण्यासारखी एखादी संस्था निर्माण करता येईल का? ... रा. ब. रानडे यांनी अनेक संस्था निर्माण केल्या. परंतु त्यांनी आपल्या मंडळासारखी संस्था निर्माण केली नाही हे खरोखरीच आपले, आपल्या देशाचे दुर्दैव होय. अशी जर एखादी संस्था त्यावेळी निर्माण झाली असती व जर अशा संस्थेच्या कृपेच्या छत्राखाली माझ्यासारख्यास काम करावयास मिळून जरूर तितके स्वास्थ्य असते तर, आपणास अतिशयोक्ति वाटेल म्हणून सहस्रपट म्हणत नाही, पण शतपट काम मी सहज उरकले असते."[१४]

मंडळासाठीचे सहकारी (सरदार मेहेंदळे) आणि जागा (मेहेंदळे वाडा) यांच्या निवडीबाबत राजवाडे यांचे उद्‌गार भा. वा. भट यांनी पुढीलप्रमाणे नोंदवले आहेत - "भारतखंडाच्या इतिहासाच्या साधनांचे संशोधन करणारी संस्था स्थापन करण्याची आवश्यकता मला वाटू लागल्यावर ती संस्था कोठे व कोणाच्या सहकार्याने स्थापन करावयाची याविषयीची विवंचना माझ्या मनात सुरू झाली. पुणेशहर हे विद्येचे माहेरघर, पूर्वकालची मराठ्यांची राजधानी, व प्रस्तुतचे या शहराचे महत्त्व, या गोष्टी लक्षात घेऊन संस्था स्थापन करण्यास पुणे-

शहर हेच योग्य ठिकाण आहे असे मी आपले मनाशी निश्चित केले. यानंतर सरदार तात्यासाहेब मेहेंदळे यांचा वाडा मंडळाच्या कचेरीकरिता मी पसंत केला. मंडळाची स्थापना करण्यापूर्वी पाचसहा वर्षे माझा व तात्यासाहेबांचा परिचय झाला होता. तात्यासाहेबांच्या वाड्याचा रस्त्यालगतचा दिवाणखाना पुरातन पद्धतीचा प्रशस्त होता. हा दिवाणखाना तात्यासाहेबांची बैठकीची जागा असून त्यातच त्यांचा ग्रंथसंग्रह असे. टेबले, खुर्च्या, दिवाबत्ती वगैरे मंडळाच्या कचेरीस लागणारे सर्व सामान जय्यत या दिवाणखान्यात तयार होते. मंडळाच्या कचेरीकरीता ही जागा विनाभाड्याने मिळाल्यास काही एक खर्च न देता मंडळाची तात्काल स्थापना करता येईल असे माझे मनात आले. मंडळाची स्थापना करावयाची म्हणजे निदान दोन सभासद पाहिजेत. त्यांपैकी तात्यासाहेब मेहेंदळे हे एक सभासद सदासर्वकाळ त्या दिवाणखान्यात बसलेलेच असत. दुसरा सभासद मी स्वतः होतो. सर्व पुणे शहरात तात्यासाहेबांइतका मंडळाचा सभासद होण्यास लायक गृहस्थ पुष्कळ विचाराअंती मला आढळला नाही. निरनिराळ्या विषयांवरील नामांकित ग्रंथांचे तात्यासाहेबांचे वाचन गाढ होते. कोणताही महत्त्वाचा इंग्रेजी अगर मराठी ग्रंथ प्रसिद्ध झाला म्हणजे तो तात्यासाहेबांकडे यावयाचाच व त्यांनी त्याचे वाचन करावयाचे असा त्यांचा स्वभाव होता. याशिवाय तात्यासाहेब हे डॉक्टर भांडारकरांचे प्रिय शिष्य असून हरहमेशा त्यांच्या भेटीगाठी निरनिराळ्या विषयांवरील चर्चेस्तव होत असत. मंडळाचे सभासद होण्यास तात्यासाहेबांचे ठिकाणी या गुणांशिवाय मला अवश्य वाटणारा एक गुण म्हणजे इतिहासप्रसिद्ध आप्पा बळवंत मेहेंदळे पेशव्यांचे नातेवाईक यांचे तात्यासाहेब हे वंशज होते. तात्यासाहेबांचे पूर्वज आप्पा बळवंत हे पानिपतच्या युद्धात धारातीर्थी पतन पावले होते. अशा नामांकित घराण्याचा वंशज इतिहासमंडळाच्या आद्य संस्थापकांत असणे हे औचित्यदृष्ट्या मला युक्त वाटले. या सर्व गुणांस्तव भारत इतिहास-संशोधक मंडळाच्या स्थापनेसाठी तात्यासाहेबांचे सहकार्य घेण्याचे मी ठरविले व त्यांचा वाडा मंडळाच्या कचेरीकरीता मी पसंत केला."[१५]

खुद्द सरदार खंडेराव मेहेंदळे (मंडळाचे पहिले चिटणीस व खजिनदार) यांनी मंडळाची स्थापना व उद्देशांबाबत पहिल्या वर्षाच्या अहवालात असे नमूद केले होते की, "स्वदेशाच्या व इतर देशांच्या लोकांच्या इतिहासाच्या साधनांचा अभ्यास व शोध करण्याकडे अलीकडे बऱ्याच लोकांचे लक्ष लागलेले दिसते. कमीत कमी सध्या देशात दहापंधरा शोधक यथाशक्ती काम करीत आहेत. निव्वळ शोधक सोडले तरी समानशील अशा गृहस्थांची संख्या काही थोडीथोडकी नाही. असे शोधक व समानशील गृहस्थ कोठेतरी एकत्र जमण्याची काहीतरी सोय असावी असे अनेकांना वाटत होते. तो योग या मंडळाच्या द्वारा जुळून आलेला आहे. त्याचा फायदा आस्ते आस्ते अनेक लोक घेतील यात बिलकूल संशय नाही. एकत्र जमण्याने शंका, समाधान, प्रश्न, विचारपूस तेथल्या तेथे समक्ष करता येऊन व्यक्तिमात्राच्या विस्कळित प्रयत्नांना संकलित रूप मिळते. होतकरू शोधकांना कामाची दिशा कळते आणि अशा रीतीने सर्वांना इष्ट जे संशोधन त्याची प्रगती होते. लेखांचा संग्रह करण्याचे, तो सुरक्षित ठेवण्याकरिता संग्रहालय उभारण्याचे, उभारलेले संग्रहालय चालू ठेवण्याकरिता फंड जमविण्याचे, ऐतिहासिक ग्रंथसंग्रह जुळविण्याचे, संदर्भग्रंथ एकत्र आणण्याचे, ताम्रशिलादि लेखांच्या संशोधनाचे व संग्रहाचे, पुराणवस्तूंचे नकाशे काढण्याचे, मूर्तींचा एकत्र जमाव करण्याचे वगैरे अनेकविध कार्य आपल्यापुढे आहे; इतकेच नव्हे, तर नानाविध उद्योग करताना सामान्य लोकांना सहज प्रिय होतील असे इतिहासग्रंथ निर्माण करण्याकडेही आपण लक्ष पोहोचविले पाहिजे. हे काम आस्ते आस्ते उठविण्याचे सत्कृत्य आपल्या हातून निग्रहपणे व विजयाने तडीस जाईल व हा उद्योग करण्यास देशांतील विद्वान् धनिक व समानशील लोक आपल्याला खचित साहाय्य करतील अशा हुरूपाने पुढील वर्षाच्या कामगिरीला आपणास लागावयाचे आहे." (भा. इ. सं. मंडळाचा अहवाल शके १८३२ परिच्छेद ७).[१६]

मंडळाच्या नावातील 'भारत' या शब्दाचे स्पष्टीकरण १९२५ च्या टिपणात राजवाडे पुढीलप्रमाणे देतात – "मंडळाचे नाव – मराठ्यांनी सर्व हिंदुस्थान व्यापिले. तेव्हा साऱ्या भारताचे संशोधन आवश्यक, सबब भारतेतिहास मंडळ असे नाव."[१७] भारत इतिहास संशोधक मंडळाच्या स्थापनेबाबतचे आपले उद्देश आणि अपेक्षा

अनुक्रमणिका

मंडळाच्या तिसऱ्या संमेलनप्रसंगी – म्हणजे १९१३ मध्ये राजवाड्यांनी स्पष्टपणे नमूद केल्या होते. मंडळाच्या घटनेमध्ये 'उद्दिष्टे व ध्येये' या विभागात त्यांचीच विस्तृत मांडणी केलेली आढळते. इतिहास–विषयक साधन–सामग्रीचे संशोधन, तिचा संग्रह, जतन, अभ्यास आणि प्रकाशन हे त्यातील प्रमुख उद्देश म्हणता येतील. या संस्थेला 'संशोधन मंडळ' न म्हणता 'संशोधक मंडळ' म्हटलेले होते. कारण रूढ अर्थाने ही संशोधन–संस्था नव्हती. औपचारिक आणि पोटार्थी संशोधनाचे ते केंद्र नव्हते. आवश्यकतेनुसार पगारी संशोधक नेमण्याची सोय असली, तरी स्वयंस्फूर्त आणि ध्येयवादी संशोधनावर भर होता. असे संशोधन करणाऱ्यांनी एकत्र यावे, विचारांची देवाण–घेवाण करावी, साधार मांडणी करावी, मंडळातील उपलब्ध सुविधांचा लाभ घ्यावा, असा उद्देश होता. इतिहासाबाबतचे औदासिन्य आणि संन्यासप्रवणता सोडून लोकांनी संघशक्तीचा आश्रय घ्यावा, असे राजवाडे मानत होते. 'सरकारचा मिंधेपणा पत्करला तर संस्था लोकहित-दृष्ट्या निरुपयोगी बनतात' असे नमूद करून त्यांनी म्हटले होते की, "कर्ता–करविता स्वदेशातील अभिमानी समाज आहे."[१८]

अशा आपल्या 'भारत इतिहास संशोधक मंडळा'ने शताब्दीचा टप्पा गाठला, याचा आनंद वाटतो. मंडळाच्या पुढच्या वाटचालीसाठी कर्त्या करवित्या स्वदेशातील अभिमानी समाजाची आर्थिक आणि कार्यरूपी मदत मंडळास मिळत राहो, हीच या निमित्ताने शुभेच्छा.

**संदर्भ आणि टिपा :**

❖ भारत इतिहास संशोधक मंडळाच्या 'शताब्दी स्मरणिके'साठी लिहिलेला हा लेख नवभारतच्या वाचकांसाठी आम्ही पुनर्मुद्रित करीत आहोत – संपादक.

१. भास्कर वामन भट, *इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांचे चरित्र व राजवाड्यांच्या दोन तपांचा विद्वत्सहवास*, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९४६, पृ. २४५ वर उद्धृत.

२. अधिक तपशिलांसाठी प्रस्तुत लेखकाचे पुढील तीन लेख पाहा :

   १. डॉ. राजा दीक्षित, 'संस्कृतीचे राजकारण : महाराष्ट्रातील राष्ट्रवाद', *इतिहास शिक्षक*, इतिहास शिक्षक महामंडळ, महाराष्ट्र, कोल्हापूर/पुणे, ऑक्टो, १९९९ ते मार्च २०००, पृ. ३–६.

   २. Raja Dixit, 'Historical Writings And Research', in Rajendra Banhatti and G. N. Jogalekar (ed.), *A History of Modern Marathi Literature, Vol. II (1800 to 2000)*, Maharashtra Sahitya Parishad, Pune, 2004, pp. 238-78.

   ३. Raja Dixit, 'Historical Writings : Challenge and Response', in Shraddha Kumbhojkar (ed.), *19th Century Maharashtra : A Reassessment*, Cambridge Scholars Publishing, Newcastle, U. K., 2009, pp. 11-20.

मंडळ–स्थापनेच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीपुरताच हा लेख मर्यादित ठेवला आहे. परंतु मंडळाच्या इ. स. २००० पर्यंतच्या कार्याचा आढावा घेणारा एक लेख प्रस्तुत लेखकाने यापूर्वी लिहिला होता. जिज्ञासूंसाठी त्याचा संदर्भ पुढीलप्रमाणे :

डॉ. राजा दीक्षित, 'भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे', इतिहास शिक्षक, इतिहास शिक्षक महामंडळ, महाराष्ट्र, कोल्हापूर/पुणे, एप्रिल–मे–जून २००१, पृ. १६–२०.

३. डॉ. मु. ब. शहा (संपा.), *इतिहासाचार्य वि. का. राजवाडे समग्र साहित्य, खंड दहावा : प्रस्तावना खंड*, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे, १९९८, पृ. १.

४. कित्ता, पृ. १–२.

५. तत्कालीन (ललित व शास्त्रीय) ऐतिहासिक वाङ्मयाच्या अधिक तपशिलांसाठी पाहा :

   १. प्रा. रा. श्री. जोग (संपा.), *मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड चौथा*, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, द्वि. आ. (पुनर्मुद्रण), १९९९, प्रकरणे

७, ८, ९, ११.

२. प्रा. रा. श्री. जोग (संपा.), *मराठी वाङ्‌मयाचा इतिहास, खंड पाचवा : भाग पहिला*, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, १९७३, प्रकरणे ३,४,५.

३. प्रा. रा. श्री. जोग, *मराठी वाङ्‌मयाचा इतिहास, खंड पाचवा : भाग दुसरा*, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, १९७३, प्रकरणे १ व २.

४. ग. ह. खरे आणि अ. रा. कुलकर्णी (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड तिसरा, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८६, परिशिष्ट १.

६. लॉर्ड मेकॉले याचे मूळ विधान (२ फेब्रुवारी १८३५) पुढीलप्रमाणे :
"We must at present do our best to form a class who may be interpreters between us and the millions whom we govern - a class of persons Indian in blood and colour, but English in tastes, in opinions, in morals and in intellect." Cited in B. B. Misra, The Indian Middle Classes : Their Growth in Modern Times, Oxford University Press, New Delhi, 1978, pp. 11 and 154.

७. गं. बा. सरदार, *अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठीका*, मॉडर्न बुकडेपो प्रकाशन, पुणे, तृ. आ. १९७१, पृ. ७८ वर उद्धृत.

८. अधिक संदर्भासाठी पाहा –
द. दि. पुंडे, 'आरंभकालीन मराठी वाङ्‌मयेतिहास-लेखन आणि महाराष्ट्र सारस्वत', समाविष्ट विद्यागौरी टिळक (संपा.), *वाङ्‌मयेतिहासलेखन : स्वरूप आणि समस्या*, प्रतिमा प्रकाशन, पुणे, १९९९, पृ. ३८-६५.

९. भ. श्री. पंडित (संपा.), *समग्र केशवसुत*, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७८, पृ. २४०.

१०. (बाळ गंगाधर टिळक), *समग्र लोकमान्य टिळक, खंड ४ (नवें नेतृत्व)*, केसरी प्रकाशन, पुणे, १९७६, पृ. ३६.

११. डॉ. मु. ब. शहा (संपा.), पूर्वोक्त प्रस्तावना खंड, पृ. ४४९.

१२. भा. वा. भट, पूर्वोक्त, पृ. २४६.

१३. अधिक संदर्भासाठी पाहा –
कित्ता, भाग ५ वा : 'इतिहाससंशोधनादि कार्यसिद्धी-स्तव राजवाड्यांचे मंडळीकरण', पृ. २०३–१९.

१४. म. श्री. माटे, 'आमची पाऊणशे वर्षे', समाविष्ट *भारत इतिहास संशोधक मंडळ*, पुणे, त्रैमासिक, पुणे, वर्ष ६७ : अंक १–४, जुलै ८८ – एप्रिल ८९, पृ. २५ वर उद्धृत.

१५. भा. वा. भट, पूर्वोक्त, पृ. २२०–२१ वर उद्धृत.

१६. कित्ता, पृ. २१९–२० वर उद्धृत.

१७. कित्ता, पृ. २४६ वर उद्धृत.

१८. डॉ. मु. ब. शहा (संपा.), पूर्वोक्त प्रस्तावना खंड, पृ. ३४६.

☆☆☆



# विदर्भ संशोधन मंडळ

– प्रा. म. शं. वाबगावकर

इ. स. १९३३ च्या डिसेंबरात नागपुरात भरलेल्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनासाठी येथे आलेल्या म. म. द. वा. पोतदारांच्या सूचनेवरून **कै. माडखोलकर आदींच्या पुढाकारान** २ जानेवारी १९३४ रोजी तेव्हाचे सुप्रसिद्ध संशोधक व साहित्यिक नी. स. भवाळकर ह्यांच्या अध्यक्षतेखाली येथील सिटी कॉलेजात सभा भरून 'वाङ्मय, इतिहास संशोधन मंडळ' स्थापन झाले. त्यातून सर भवानी शंकर नियोगी ह्यांच्या अध्यक्षतेखाली ३० जणांचे नियामक मंडळ निर्मून प्रो. पोतदार व य. खु. देशपांडे ह्यांना त्यावर सल्लागार व नंतर सन्मान्य सभासद घेण्यात आले. **१४ जानेवारी १९३४ रोजी प्रो. मिराशींनी 'खामखेड** येथील ताम्रपट' हा शोधनिबंध मंडळात वाचून मंडळाच्या स्थापनेचा शुभारंभ केला. त्या घटनेला यंदा पाऊणशे वर्षे पूर्ण होत आहेत. मंडळ सुरू झाले **तेव्हा त्याचे ३२ सभासद होते**. व सभासदत्व वार्षिक वर्गणी रू. ३ होती! तेव्हाचे नाव मध्यप्रांत संशोधन मंडळ, १९५४ पासून मध्यप्रदेश संशोधन मंडळ व सांप्रत विदर्भ संशोधन मंडळ. मंडळाचे **वार्षिक १९५८ पासून सुरू** झाले. वार्षिकातील लेखांची १९५८ ते १९८३ पर्यंतची सूचि १९८३ चे वार्षिकात आहे. ती **अद्ययावत् करून पुस्तिके**च्या रूपात प्रकाशित व्हावी. मंडळाचे **उत्साही सभासद कवि अनिल उमरेडास सब्‌जज् असतांना** १९३५ साली देवटेक येथे एकाच शिलेवर दोन प्राचीन लेख असल्याचे त्यांना कळले, ते त्यांनी लगेच मिराशींना सांगितले. तेव्हाच्या हिंदुस्थान सरकारने मिराशींसाठी मध्यप्रदेशातील कलचुरि राजवंशाच्या लेखांचे छाप घेण्यास्तव धाडलेला तंत्रज्ञ माणूस (टेक्नीशियन) येथे होता. त्याला घेऊन निघालेल्या ह्या संशोधक मंडळींचा पहिला मुक्काम पवनीस झाला. तिथल्या जुन्या शिलालेखाचा छाप घेऊन ते देवटेकास गेले. एक अशोक कालीन (तेवीसशे वर्षांपूर्वीचा) व दुसरा वाकाटक पहिल्या रूद्रसेनाचा असे दोन लेख **एकाच शिलेवर** मिळाले. दोन महिन्यांनी म्हैसूरच्या प्राच्यविद्यापरिषद अधिवेशनात मिराशींनी त्यावर लेख वाचला असता अशोककालीन लेखाचा छाप पाहताच सुप्रसिद्ध संशोधक इतिहासकार कै. डॉ. काशीप्रसाद जयस्वाल ह्यांना आनंदाचे भरते आले! **त्यात अशोकाच्या विदर्भातील धर्ममहामात्राने (धर्म खात्याच्या मंत्र्याने) प्राण्यांना पकडू नये, मारू नये अशी अशोकाची आज्ञा** उद्घोषित केली आहे.

१८६२ साली पुराणवस्तू संशोधनाचे स्वतंत्र खाते निर्माण करून इंग्रज सरकारने जनरल सर अलेक्झँडर कनिंगहॅम ह्याला त्याचा डायरेक्टर जनरल नेमले. त्याचा सहायक बेग्लर नागपूरजवळ रामटेकास गडावर गेला असता, देवळात अहिंदु म्हणून त्याला प्रवेश मिळाला नाही. तेव्हा आत काय आहे असे त्याने बाहेरून विचारले असता, राम आहे, लक्ष्मण आहे, सीता आहे, **रामझरोका** आहे, असे त्याला सांगण्यात आले. त्यावर त्याने 'रामझरोका हा देव कोण आहे बुवा? हू ईज् धिस् गॉड रामझरोका' असे आपल्या रिपोर्टात लिहून ठेविले आहे! रामझरोका हे श्रीरामाच्या मागच्या बाजूच्या **खिडकीचे नाव; त्याला तोहि देवच वाटला ! पुराणवस्तु खात्यातर्फे ह्या प्रांताची पहिली पाहणी १८७४ त** झाली. **१८९३, ९४ साली पुण्यास हेन्री कझेन्स वेस्टर्न सर्कलचा सुपरिंटेंडेंट नेमला गेला**. त्याने परिश्रमपूर्वक **मध्यप्रदेशातील पुरावशेषांची सूचि** (लिस्ट ऑफ ॲण्टिक्वेरियन् रिमेन्स इन् सी. पी. अँड बेरार) **१८९७ साली List of Antiquarian Remains in C. P. & Berar कलकत्त्याहून छापली. १९३१ साली प्रसिद्ध झालेला** 'दख्खनची मध्ययुगीन देवळे' Mediaeval Temples of the Deccan हा त्याचा सुंदरग्रंथ.

१९०१ च्या शिरगणतीसाठी व जिल्हावार गॅझेटियर्सनिर्मितीसाठी आर्. व्ही. रसेलचे सहाय्यक म्हणून रा. ब. हिरालाल नेमले गेले. दोघांनी मिळून **Tribes and Castes of C. P. & Berar** या प्रांतातील वंश,

अनुक्रमणिका






जमाती, जाति **याचे ४ खंड छापल** ते मौलिक अभ्यास-साधन होत. मध्यप्रांत वऱ्हाडातील कोरीव लेखांची सूचि (१ ली आवृत्ती १९१६, २ री १९३२) हा रा. ब. हिरालालांचा अति उपयुक्त साधन ग्रंथ. या प्रांतातील ३ हजार हस्तलिखितांची सूचिहि त्यांनी परिश्रमपूर्वक प्रसिद्ध केली. **ई. ए. सी. (डेप्युटी कलेक्टर), डी. सी. (म्हणजे कलेक्टर)** ह्या नात्याने **त्यांना दौऱ्यावर जावे लागे; त्याचा उपयोग ते आपल्या शोधकार्यासाठी करून घेत.** त्यांचे 'मध्यप्रदेश का इतिहास' अभ्यसनीय आहे. ह्या **प्रांतातील १ ली संशोधन संस्था 'शारदाश्रम' १९२६ त यवतमाळास** स्थापणारे डॉ. य. खु. देशपांडे डी. लिट्. ह्यांनी ३० घराण्यातून हस्तलिखिते मिळवून त्यातील काही पोथ्या शारदाश्रमात ठेवून **२ हजार पोथ्या १९४५ साली नागपूर विद्यापीठास दिल्या.** एकट्या वणीत लोकनायक बापूजींचे बंधु यादवराव अणे ह्यांना व त्यांना शेकडो **हस्तलिखिते** मिळाली. ६०० चे वर! नागपूर विद्यापीठ हस्तलिखित विभागातील **(स्थापना १९४६) संस्कृत पोथ्या ३६६३!** ही संख्या आता पुष्कळच वाढली असणार. विदर्भ संशोधन मंडळातही **बहुत रूमाल** आहेत. वऱ्हाडातील भोसले कालीन संस्कृत पंडित गंगाधरशास्त्री मंग्रुळकर यांचे संग्रहातील २०० पोथ्या तपासून त्यांनी लिहिलेले १५ ग्रंथ संशोधक श्री. दे. गो. लांडगे यांनी (हे वि. सं. मंडळाचे बहुत वर्षे उत्साही कार्यवाह होते.) विद्यापीठास दिले. त्यावर प्रो. डॉ. हर्षदा दवे (ग्रंथपाल व हस्तलिखिताधिकारी, कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक) ह्यांनी पीएच्. डी. प्राप्त केली आहे. मंडळाचे साहित्य महाल विभागात सिटी कॉलेजच्या एका खोलीत होते व निबंधवाचन **सभा सिटी कॉलेजच्या सभागृहात होत.** पुढे विदर्भ साहित्य संघाच्या तेव्हाच्या इमारतीत वरच्या मजल्यावर लो. टिळक सभागृहात मंडळ गेले. आता स्वतःच्या जागेतील भव्य वास्तूत (२, वेस्ट हायकोर्ट रोड, सिव्हिल लाइन्स, संस्कृत भाषा प्रचारिणी सभेच्या बाजूस) ते कार्यरत आहे. **मंडळाच्या वार्षिकोत्सवाचे अध्यक्ष म्हणून** डॉ. य. खु. देशपांडे, 'वऱ्हाडचा इतिहास', 'नागपूर प्रांताचा इतिहास' लिहिणारे **विदर्भाचे आद्य इतिहासकार लोणारचे या. मा. काळे,** मराठी भाषा : उद्गम आणि विकास, मराठी व्युत्पत्तिकोश इत्यादींचे कर्ते प्रा. कृ. पां. कुलकर्णी, 'राष्ट्रकूटाज् अँड देअर टाईम्स'चे कर्ते डॉ. अ. स. अळतेकर, 'भगवान् बुद्ध' कर्ते प्रा. धर्मानंद कोसंबी, पालिपंडित डॉ. प. ल. वैद्य, समर्थभक्त शं. श्री. देव, वैदिक निबंध, चित्पावन इत्यादींचे कर्ते प्रसिद्ध विद्वान् श्री. ना. गो. चापेकर, म. म. द. वा. पोतदार, न. र. फाटक, 'केसरी'चे संपादक ज. स. करंदीकर, लोकनायक बापूजी अणे, 'विज्ञान बोध' कर्ते प्रा. श्री. म. माटे इत्यादी नामवंत विद्वान् आजवर लाभले आहेत. **मंडळाच्या दप्तरात गोविंदराव ब्राह्मणाने** १४.४.१८८८ ला नकलून संपविलेली **गोंड राजांची बखर** अजून **अप्रकाशित** आहे. **ती छापली जायला हवी.** RajGord MahaRajas of Satpura Hills ह्या आपल्या प्रसिद्ध ग्रंथात सी. यू. **विल्स, आय्. सी. एस्. ह्यांनी (१९२३) एका तळटीपेत तिचा उल्लेख केला आहे!**

प्राचीन भारतीय इतिहास, साहित्य, संस्कृति यांच्या संशोधनासाठी ईस्ट इंडिया कंपनीचा न्यायाधीश विल्यम जोन्स याचे प्रयत्नाने कलकत्त्यास **इ. स. १७८४ त 'रॉयल एशियाटिक सोसायटी'** निघाली. **मुंबईत १८०३ त** अशीच संस्था निघाली, **१८२९ त ती ग्रेट ब्रिटनच्या मूळ संस्थेची शाखा** बनली. १८४१ त निघालेल्या **तिच्या १ ल्या** खंडात नागपूर म्यूझियम्मधील परमार नृपतींच्या शिलालेखावर बाळशास्त्री जांभेकरांचा ('दर्पण'कार (१८३२), **मराठी पत्रकारिकतेचे विख्यात जनक,** प्रोफेसर नेमला गेलेला १ ला भारतीय, त्याआधी सर्व प्रोफेसर युरोपीय असत!) लेख आहे! नागपुरात सरकारी म्युझियम्, पुराण वस्तुसंग्रहालय **१८६३ त कार्यरत** झाले. स्थापना कालानुक्रमाने **हिंदुस्थानातले १ ले म्युझियम कलकत्त्याचे व २ रे हे नागपूरचे!** १९३१ साली पुराणवस्तु संशोधन खात्याचे डेप्युटी डायरेक्टर रा. ब. काशीनाथपंत दीक्षित उत्खनन योग्य स्थळांची पाहणी करावयास ह्या प्रांतात आले असता त्यांचेसह य. खु. देशपांडे, वा. वि. मिराशी हेहि ह्या संशोधन दौऱ्यात होते. दीक्षितांनी भारत सरकारचे तेव्हाचे गव्हर्नमेंट एपिग्राफिस्ट (कोरीव लेखांचे अधिकारी) डॉ. हीरानंद शास्त्री यांना लिहून देवगिरीच्या सम्राट सिंघण यादवाचा बुलडाणा जिल्ह्यांतील अमडापूरचा व अकोल्याजवळील बार्शी टाकळी येथील एका हजार वर्षांपूर्वीच्या








राजवंशाचा अशा दोन लेखांचे छाप मिराशींना पाठविले. लेख **खराब स्थितीतले; वाचणे कठीण;** पण मिराशींनी तेथे जाऊन समक्ष पाहून प्रयत्नपूर्वक ते वाचून संपादून 'एपिग्रफिया इंडिका'मध्ये प्रसिद्ध केले. **मिराशींच्या कोरीव लेख संशोधनाचा तो शुभारंभ होय.** भारत-सरकारच्या पुराणवस्तु खात्याने भारतातील यच्चयावत् कोरीव लेखांच्या संग्रहग्रंथांची **ग्रंथमाला** 'कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम् इंडिकेरम्' Corpus Inscriptionum Indicarum ह्या नावाने छापली. तिच्यातील **सर्व खंडांचे संपादक** आंतरराष्ट्रीय कीर्तीचे **युरोपीय विद्वान्** असत. **त्यामालेतील ग्रंथांचे संपादन करण्याचा मान मिळालेले पहिले भारतीय संशोधक मिराशी होत.** वाकाटक गुप्त वंश व कलचुरि चेदि वंश ह्यांच्या लेखांचे मिळून **दोन खंड त्या मालेत मिराशींनी संपादिले.** भारत-विद्येच्या, विशेषतः **कोरीवलेख विद्येच्या क्षेत्रातील त्यांचे कर्तृत्व** केवळ विदर्भ संशोधन मंडळालाच नव्हे, **भारताला भूषणावह आहे.** तेव्हाच्या मध्यप्रदेश शासन साहित्य परिषदेने **तेव्हाचे राष्ट्रपति डॉ. राजेंद्र प्रसाद** ह्यांचे हस्ते मिराशींचा, ह्या महत् कार्यासाठी सत्कार केला होता. मंडळाचे ते **प्रमुख आधारस्तंभ होत.**

मुंबईला ज्याचे नावे कॉलेज आहे तो एल्फिन्स्टन् नागपुरात भोसले दरबारी इंग्रजांचा वकील होता. येथून काबूलला व तेथून पुण्यास तो बदलून गेला. पुण्याचे मराठ्यांचे राज्य १८१८ त त्याने बुडविले. नागपूरचे राज्य **१८५३ पावेतो** होते. नंतर १८०७ साली येथे जेन्किन्स् इंग्रजांचा वकील म्हणून आला. त्याने त्याचा आश्रित **विनायकराव औरंगाबादकर** यास चंद्रपूर, सिरपुर, रायपूर, रतनपूर इत्यादी स्थळीं पाठवून तेथील शिलालेखांची माहिती आणवून ती बंगालच्या एशियाटिक सोयायटीच्या **'एशियाटिक रीसर्चेस्' व्हॉल्यूम १५** मध्ये छापली. **विनायकराव हे ह्या प्रांतातले पहिले इतिहास संशोधक. त्यांनी लिहिलेल्या ७ फारसी किताबी,** गुजाबादादा गुजर, सखाराम महिपत गुप्ते, **भोसल्यांचा इंग्रज दरबारी वकील बगाजी रघुनाथ** यांच्या बखरी, **१८१३ च्या जेन्किन्ससह केलेल्या पुणे प्रवासा**चा वृत्तान्त, दरबार मुत्सद्यांचे अहवाल, **शिवाजीच्या व पेशव्यांच्या बखरी, भोसल्यांच्या परराष्ट्रीय पत्रव्यवहाराचे २ खंड** इत्यादि **१५ खंड लंडनला इंडिया ऑफिस लायब्ररीत आहेत.** १९३९ त डॉ. य. खु. देशपांडे **ह्यांनी स्वतः तेथे जाऊन ते पाहिले, त्यांची टिपणे घेतली.** नागपूरकर भोसल्यांच्या चिटणीस दप्तरातून हुकूमनामे, तहांच्या नकला विनायकरावाने घेतल्या होत्या. त्यातील दुसऱ्या रघूजीस (मृत्यू १८१६) आलेल्या **११३ पत्रांच्या** मायक्रोफिल्म्स् तेथून मागवून वि. सं. मंडळाचे विद्यमान कार्याध्यक्ष डॉ. कोलारकर ह्यांनी संपादून प्रसिद्ध केल्या आहेत. तशा **भोसल्यांचा इंग्रज दरबारी वकील बगाजी रघुनाथ,** श्रीमंत **गुजाबादादा** गुजर, सखाराम हरि गुप्ते यांच्या बखरींचे **सूक्ष्मपट (मायक्रोफिल्म्स्) मागवून छापले पाहिजेत. नागपूरकर भोसले इतिहासाची ती मौलिक साधने होत. मोडी वाचन, शिलालेखवाचन यांचे वर्ग मंडळात व्हावेत.** मिराशींचे 'संशोधन मुक्तावलि'चे १० सर, त्यांचे स्टडीज् इन् इण्डोलॉजी, ग. त्र्यं. देशपांड्यांचे इण्डोलॉजिकल् पेपर्स, डॉ. देवपुजारींचे मराठा आर्ट ऑफ वॉर वुइथ स्पेशल रेफरन्स टु शिवाजी, डॉ. ओ. पी. वर्मांचे यादवाज् अँड देअर टाइम्स, कोलते व य. खु. दे. ह्यांचे अनुक्रमे मूर्तिप्रकाश व निरुक्त शेष, दे. गो. लांडग्यांचे संशोधनांजलि, नागपूरचा सांस्कृतिक इतिहास इत्यादी, **मंडळाच्या मौलिक प्रकाशनांची जाहिरात ठळक नियतकालिकातून आल्यास इतिहासप्रेमींना त्यांची माहिती होईल. विदर्भात सुमारे १०० हेमाडपंती देवळे आजहि आहेत. गाविलगड किल्ल्यातील २ शिलालेख, लांजी, पिंजर, मंडपगावचा व चिकणीचा शिलालेख अजून अप्रकाशित आहेत.** नव्या अभ्यासकांसाठी **न नांगरलेली संशोधनभूमि विदर्भात अजून विपुल आहे.** संशोधन मंडळाच्या ह्या अमृतमहोत्सवातून हा जगन्नाथाचा रथ पुढे वाहून नेण्याची प्रेरणा नव्यांना मिळावी. **कारण जे इतिहास विसरतात, ते इतिहास घडवू शकत नाहीत** असा इतिहासाचा निर्वाळा आहे.

**महाराष्ट्रातील इतिहासविषयक आरंभीच्या प्रयत्नांचा आढावा** कै. रा. ब. पारसनीसांच्या **'भारतवर्ष' मासिकात १८९७ त** आला आहे, त्या प्रयत्नात नागपुरातील अभ्यासूंचीहि मदत आहे. स्प्रेंगेल **(१७९१), आपल्या इतिहासात मराठ्यांना Celebrated but unknown** म्हणजे भारतात सेलेब्रेटेड पण युरोपात

अन्नोन म्हणणारा स्प्रेंगेल, नंतर स्कॉटवेरिंग (१८१०), ग्रँट डफ (१८२६), मॉरिस, ब्रिग्ज, टॉड् व माल्कम इत्यादि इतिहासकार **सरकारी अधिकारी** होते. व त्यांच्यात परस्पर सहकार्य असे. मुंबईच्या एशियाटिक सोसायटीचे त्यांना प्रोत्साहन होते. मध्य प्रांतात भोसल्यांचे राज्य १८५३ पावेतो असल्याने नवीन दृष्टि येथे उशीरा आली. १९०३ पावेतो वऱ्हाड मध्यप्रांताशी संलग्न नव्हता. मुंबईत १८५७ त विश्वविद्यालय स्थापन झाले तर ह्या प्रांतात १८६१ मध्ये पहिल्यांदा नवीन अंमल सुरू झाला; नागपूर विद्यापीठ १८२३ त स्थापन झाले. येथे सिटीस्कूल स्थापण्याचा प्रयत्न चालू होता तेव्हा तिकडे (१८६८) 'विविध ज्ञानविस्तार' निघाले व ग्रँट डफच्या इतिहासावर टीका करण्यापर्यंत **कीर्तन्यांनी** मजल गाठली. बाळशास्त्री जांभेकर १८४१ त संशोधन लेख लिहू लागले; त्याच्या ३८ वर्षे आधी रॉयल एशियाटिक सोसायटी मुंबईत स्थापनापन्न झाली होती. **१८६४ त न्या. मू. रानडे एम्. ए. झाले, येथे कलकत्ता विद्यापीठाचे केंद्र १८८६ त निघाले व येथील नागपूर प्रांताची बी. ए. ची पहिली तुकडी १८८७ त परीक्षेला गेली.** जगन्नाथ शंकरशेट, डॉ. भाऊ दाजी लाड, भगवानलाल इंद्रजी, रा. सा. मंडलीक, न्या. मू. तेलंग, रा. ब. शंकर पांडुरंग पंडित, सर भांडारकर हे **'निबंधमाला' (१८७४) व 'काव्येतिहास-संग्रह' (१८७८) यांच्यापूर्वीच संशोधनकार्यात गुंतले होते.** १८७३ ते १८८२ ह्या काळात भांडारकरांनी तिकडून पाठविलेले, इथल्या नीलसिटी स्कूलचे मुख्याध्यापक **हरि माधव पंडित** पुढे आले. **ते नागपुरात राहून 'विविध ज्ञानविस्तारा'चे एक संपादक झाले,** काव्ये-तिहाससंग्रहात लिहू लागले. त्यांनी १८७६ पासून इंग्रजी ग्रंथांच्या आधारे क्रमशः विविधज्ञान विस्तारात नागपूरचा छोटासा इतिहास लिहिला व पुढे त्याला ऐतिहासिक घराण्यांची पुस्ती जोडून तो प्रसिद्ध करण्यात आला. **भांडारकरांनी पाठविलेल** दुसरे संशोधक **वामन दाजी ओक ह्यांनी गुप्तेकृत नागपूरकर भोसल्यांची बखर १८८८ त प्रसिद्ध केली** व काव्येतिहाससंग्रहातून भोसले पेशवे **पत्रव्यवहाराची ७९ पत्रे सटीप प्रसिद्ध केली.** त्यांच्या टीपा समर्पक, माहितीपूर्ण व विश्वसनीय आहेत. हीच ७९ पत्रे पुढे इतिहासकार यादव माधव काळे ह्यांनी स्वतःच्या संग्रहातील आणखी काही पत्रांची भर घालून ऐतिहासिक पत्रव्यवहार नावाने कृ. पां. कुलकर्णी यांचेसह पुनःसंपादित व पुनर्मुद्रित केली. व **या. मा. काळे संपादित गुप्तेकृत भोसले बखरीची नितांतसुंदर नवी आवृत्ति १९३७ त विदर्भ संशोधन मंडळाने प्रसिद्ध केली.** नागपुरातील विनायकराव षडंगुळे ह्यांच्या **'नीरजोल्लास' मासिकाने (१८९२)** काही ऐतिहासिक स्फुटे छापली. न्या. मू. रानड्यांच्या Rise of The Maratha Power 'मराठ्यांच्या सत्तेचा उदय' ह्या बहुमोल ग्रंथानंतर सर्वांचीच दृष्टि फाकली. द. ब. पारसनीस, मोडक, वासुदेवशास्त्री खरे ह्यांच्या प्रकाशनामुळेहि येथील इतिहासावर प्रकाश पडत गेला. नंतरचा विराट प्रयत्न **इतिहासाचार्य** राजवाड्यांचा. १८९८ पासून त्यांनी मराठ्यांच्या इतिहाससाधनांचे २२ खंड काढले. पैकी **विशेषतः खंड ३ मधील पत्रे नागपूरच्या इतिहासलेखनाला साहाय्यभूत आहेत. १९२१ पासून निघणाऱ्या भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकातून** म. म. मिराशी, डॉ. य. खु. देशपांडे, प्रिन्सिपल ह. ना. नेने ह्यांनी विविध कालखंडान्तर्गत ऐतिहासिक व साहित्यिक विषयांवर लिहिले आहे. सरदेसाई संपादित पेशवे **दप्तराच्या ४५ खंडांपैकी २० व्या** खंडात १७१७ ते १७७४ पर्यंतचा नागपूरकर भोसल्यांच्या कामगिरीचा पत्ररूप इतिहास पाहावयास मिळतो. १७८१ ते १८२० या काळातील पुणे रेसिडेन्सीतील इंग्रजीपत्रे या. मा. काळ्यांनी संपादिली आहेत. पेशवेदप्तर खंड १, ६, १७, २८, २९ यांतहि नागपूरकर भोसल्यासंबंधी बरीच पत्रे आहेत. वाडपारसनीसांचे सनदातहनामे उपयुक्त आहेत. सर जदुनाथ सरकार, आर्. डी. बॅनर्जी, हरेकृष्ण मेहताब (हे पुढे ओरिसाचे मुख्यमंत्री होते) यांच्या ग्रंथांमुळे भोसल्यांच्या ओरिसातील कारकिर्दीवर काही प्रकाश पडतो. १७५१ साली मराठे ओरिसात शिरले. १८०३ पावेतो ओरिसा त्यांच्या ताब्यात होता. त्या काळात तेथे मराठ्यांचे ९ गव्हर्नर झाले. त्यात शिवभट साठे पहिला. 'ओरिसा अण्डरदी मराठाज्' प्रबंधात त्या बंगाली संशोधकाने ओरिसातील मराठ्यांची राजवट मोगलांच्या वा इंग्रजांच्या राजवटीपेक्षा लोकांना अधिक सुखावह झाल्याचे साधार दर्शविले आहे. मराठ्यांनी स्थानिक ग्रामोद्योगांना उत्तेजन








दिले. गरीबांसाठी अन्नछत्रे चालविली. जगन्नाथाला उत्पन्नासाठी गावे लावून दिली. पुण्यातील **प्रसिद्ध वैद्य घराण्यातील** कागदपत्रांचे शं. ल. वैद्य यांनी खंडशः प्रकाशन केले. **ह्या वैद्यांचे पूर्वज नागपूरच्या भोसले दरबारात पेशव्यांतर्फे वकील** असत. प्रा. त्र्यं. शं. शेजवलकरांचे महत्त्वपूर्ण नागपूर अफेअर्स Nagpur Affairs अनुक्रमे १९५४ व १९५९ मध्ये २ भागात डेक्कन कॉलेजने प्रसिद्ध केले. **यातील भाग १, पत्र क्र. २८३ मध्ये पेशव्यांच्या बातमीदाराने नागपूरकर भोसल्यांचा वाडा पेशव्यांच्या वाड्यापेक्षाहि सुंदर होता असे म्हटले आहे!** पेशव्यांचा **शनिवारवाडा जळला. तसा नागपूरकर भोसल्यांचा राजवाडाहि २४/१/१८६४ रोजी जळला.** आग **६ महिने धुसमत होती.** जड जवाहीर वगैरे त्यापूर्वीच १८५८ त इंग्रजांनी वाडा समूळ लुटून उंटावर लादून नेले होते व कलकत्त्यास भोसल्यांच्या बहुमूल्य चीजवस्तूंचा, मालमत्तेचा इंग्रजांनी लिलाव केला होता. कलकत्त्याच्या एशियाटिक सोसायटीच्या संस्थापकांपैकी एक असलेला कोलब्रूक १७९९ त इंग्रजांचा भोसले दरबारी नागपुरात वकील होता. त्यानेहि वाडा ६ चौकी भव्य सुंदर असल्याचे लिहिले आहे. भोसल्यांच्या दसऱ्याच्या स्वारीचे वैभव पाहून तो चकित झाला. तेहि त्याने लिहून ठेविले आहे. आणि शुक्रवारतलावात मासेमारी करतांना होडीवर कोळी सुरेल गाणी गात त्याचे नवल वाटल्याचेहि त्याने लिहिले आहे! **नागपुरात बापूशास्त्री देव** व **श्रीकृष्णशास्त्री घोंगे यांजपाशी कोलब्रूक संस्कृत शिकला.** काही संस्कृत ग्रंथांची त्याने इंग्रजी भाषांतरे केली आणि **On the Vedas हा आपला प्रदीर्घ निबंध १८०५ साली प्रसिद्ध करून पश्चिमी विद्वानांचे लक्ष वेदांकडे त्याने वेधले.** माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन् मार्च १८०४ मध्ये भोसले दरबारी इंग्रजांचा वकील म्हणून नागपुरात आला. त्याचे चरित्र दोन खंडात कोलब्रूकने लिहिले आहे. **त्यातल्या दुसऱ्या खंडात तो लिहितो की मराठी राज्यात पेशव्यांच्या राजवटीत आमजनता रोजगाराची विपुलता व इतर प्रांतातून महाराष्ट्राकडे वाहणारा द्रव्याचा ओघ यांमुळे सुखी होती. पेशव्यांचा हाडवैरी असलेल्या कोलब्रूकने हे लिहिले आहे!** तलवार, नांगर व लेखणी ही तीन त्याकाळी सत्ता, संपत्ती, प्रतिष्ठा प्राप्त करण्याची साधने होती. एल्फिन्स्टन्चा लष्करी सहायक ब्रिग्ज ह्याने लिहून ठेविले आहे की मराठे तरवार बहादुरीत सर्वश्रेष्ठ आहेत. **Marhattas excell in the art of swordmanship.** पुढे ते असेहि लिहितो की खेड्यापाड्यात १६ वर्षांचा असा एकहि मुलगा नसेल, जो तरवार बहादुरीत निष्णात नाही! हे त्याने १८२९ त लिहिले तेव्हा पेशव्यांचे राज्य जाऊन ११ वर्षे झाली होती. **मग पेशवाईच्या ऐन बहरात गावोगावी शस्त्रसज्ज तरुण कसे विपुल असतील** ते सहजच कळते. १८५७ नंतर इंग्रजांनी तलवार काढून घेतली; त्यामुळे व मराठी साम्राज्य मावळताच परप्रांतातून महाराष्ट्राकडे येणारा द्रव्याचा ओघ थांबल्याने सर्व भार केवळ शेतीवर पडला व महाराष्ट्र दरिद्री असल्याची हाकाटी उत्पन्न झाली. विद्येच्या आनुवंशिक संस्कारामुळे समाजातील काही घटक इंग्रजी विद्या आत्मसात् करून सरकारी नोकऱ्यांमध्ये आधी व अधिक शिरले, परिणामतः इतर घटकांमध्ये त्यांच्याविषयी असूया उत्पन्न झाली; हा काहीसा अलिकडचा इतिहास झाला.

नागपूरकर भोसल्यांचा मूळ पुरुष परसोजी हा शिवछत्रपतींच्या तालमीत वाढलेला. **त्यांचे और्ध्वदेहिक त्यानेच** केले. शाहू खरा की खोटा ह्या वादात शाहू खरा असल्याचा त्याने दिलेला निर्वाळा ताराबाईलाहि मान्य करावा लागल्याने **शाहूचा सिंहासन प्राप्तीचा मार्ग मोकळा झाला.** Shahu's greatest help came from Parsoji Bhosle-Sardesai, History of Marathas, p. 13 शिवपुत्र राजारामाने १६९९ त परसोजीला 'सेनासाहेब सुभा' पदाने गौरवून वऱ्हाडच्या कामगिरीवर पाठविले. त्याचा पुत्र कान्होजी ह्याचे शाहूशी वितुष्ट आल्याने कान्होजीचा पुतण्या रघूजी ह्यास ते पद देण्यात आले. छिंदवाड्यापासून २४ मैलांवरील देवगडच्या बख्तबुलंद ह्या गोंडराजाने १७०२ त राजधानी नागपुरास आणली. मोगल सम्राट **अकबर १५९० त देवगडास** आला होता. १६३७ साली मोगल सम्राट शहाजहानचा सरदार खान डौरान ह्याने स्वारी करून नागपूरच्या गोंड राजाच्या किल्ल्याचे तीन **बुरुज तोफा डागून पाडल** (एक अजून आहे!), राजा कोकशहाकडून **१७० हत्ती**

**व दीड लक्ष रूपय** घेऊन तो परतला. तेव्हाचा मुस्लिम इतिहासकार अबदुल हमीद लाहोरी ह्याने बादशाहनाम्यात हे लिहून ठेविले आहे. **१७० हत्ती सहज देता आले म्हणजे त्याकाळी येथे केवढे गहन अरण्य असले पाहिजे!** ह्या बख्तबुलंदाचा पुत्र चांद सुलतान ह्याने नागपूर भोवती परकोट बांधला. **नारायणराव पेशव्यांचा खुनी इसफखाँ गारदी पळतपळत नागपूर** जबलपूर मार्गावरील शिवणीपर्यंत आला, त्याला पकडून हातापायात बेड्या टाकून, भोसल्यांचा सरदार मजीदखान (शिवणीचे नबाब) ह्याने **त्याला पेशव्यांच्या स्वाधीन केले!** पेशव्यांच्या गृहकलहात जानोजी व मुधोजी ह्या दोन भोसले बंधूंपैकी एक एका पक्षास, दुसरा दुसऱ्या पक्षास असे झाल्याने **माधवराव पेशव्यांनी १७६५ त व १७६८ त अशा नागपूरवर स्वतः दोन स्वाऱ्या करून १७६६ त नागपूर जाळले.** 'भोसले झाडीत पलोन (म्हणजे पळून) गेले' असे तेव्हाच्या अस्सल पत्रात आहे. त्यानिमित्त वऱ्हाडात माधवरावांच्या फौजेचा मुक्काम असतांना येथून त्यांच्या एका सेनाधिकाऱ्याने पुण्यास पाठविलेल्या पत्रात **सेन्यात अन्नधान्याची सवंगाई (म्हणजे स्वस्ताई) विपुल** असा उल्लेख आहे. पेशवाईतील साडेतीन शहाण्यांपैकी एक, नागपूरकर भोसल्यांचे मुत्सद्दी देवाजीपंत चोरघडे ह्यांचा आश्रित पंडित कृष्णदत्त मैथिल ह्याने त्याकाळी संस्कृतात लिहिलेल्या 'पुरंजनचरित्' नाटकात सूत्रधाराचे तोंडी "अहो सुभिक्ष्यरमणीयोऽयं देशः" (ह्या देशात खाण्या-पिण्याची किती चंगळ आहे!) असे वाक्य आहे व पुढे 'पूपाः पूरणपोलिकाश्च कथिकाः' .... म्हणजे वडे, पुरणपोळ्या, कढी इत्यादि खास नागपुरी पदार्थांची नावे गोविलेला श्लोक आहे! देवाजीपंतांच्या घरी व्यंकटेशाच्या नवरात्रात त्या नाटकाचा **प्रयोग पाहावयास अलोट गर्दी लोटल्याचा** उल्लेख आहे. म्हणजे भावार्थ समजण्या-इतके संस्कृत **त्याकाळी समाजातील सर्व थरात समजत होते!** डॉ. स. ल. कात्रे D. Litt. ह्यांनी संपादिलेले प्रस्तुत नाटक **वि. सं. मंडळाने प्रसिद्ध केले आहे.**

भोसल्यांनी **स्थानिक वस्त्रोद्योगाला विशेष प्रोत्सा-हन दिल्याची** नोंद जेंकिन्सच्या रिपोर्टात आहे. त्याकाळी **नागपुरातून पुण्यास प्रतिवर्षी १४ लक्ष** रुपयांचे कापड जाई. पेशवे ब्रह्मावर्तास गेल्यावर पुण्यास ३ लक्षांचे व ब्रह्मावर्तास दीड लक्षाचे जाऊ लागले. पहिल्या रघूजींचा शूर सरदार रघूजी करांडे ह्याने जमीनमहसूल व शेत-साऱ्याची अति उत्तम व्यवस्था लावून दिल्याने रयत त्याला पितृस्थानी मानावयाची असेहि जेन्किन्स् लिहितो. स्वस्ताईचा उल्लेखवर आलाच आहे. सर जॉन मालकम् आपल्या माळव्याच्या इतिवृत्तात लिहितो की पहिल्या **रघूजींच्या वेळी १ रू. ला १ खंडी म्हणजे ४०० पौंड** ज्वारी मिळे. जानोजींचे वेळी १ रू. ला २०० पौंड व मुधोजींच्या वेळी १ रू. ला दीडशे पौंड! पहिले रघूजी १७४३ त नागपूर राजधानीत स्थिरावले; ते १२ वर्षे राज्य करून १७५५ त वारले तेव्हा त्यांच्या ७ पैकी ६ राण्या सती गेल्या; त्याप्रीत्यर्थ **त्यांच्या सुंदर समाधीवर ६ कमानी उभारलेल्या आजहि पहावयास मिळतात!**

मुंबई ठाणे रेल्वे १८५३ त झाली. येथे रेल्वे १८६६ त आली. मुंबईत गिरण्या १८५० चे सुमारास निघाल्या, नागपुरात १८८७ त. पुण्यात जनजागृतिनिदर्शक सुप्रसिद्ध **'सार्वजनिक सभा' १८७१ त निघाली तशी नागपुरात 'लोकसभा' १८८६ त** स्थापन झाली. या प्रांतातले १ ले एम्. ए. रा. ब. बापूराव दारा किनखेडे. ते एम्. ए. झाले तेव्हा श्रीमंत चिटणीसांनी त्यांची हत्तीवरून मिरवणूक काढली व गावभर साखर वाटली! **१८६६ साली नाग-पूरच्या साडे पंच्याऐंशी हजार** (८५,५००) लोकसंख्येत **हिंदु ७५ हजार. त्यात ब्राह्मण सर्वात अधिक म्हणजे १७४१३,** नंतर क्रमाने कोष्टी (विणकर), कुणबी, मराठे, तेव्हाचे अस्पृश्य 'धेड', तेली व हिंदुस्थानी; **म्हणजे खेड्याकडून शहराकडे ब्राह्मणाचे स्थलांतर मराठे-शाहीपासूनच आहे!** येथे वस्त्रविणाई सोबत संगीत, कीर्तन कला, चित्रकला, मूर्तिकला, मल्लविद्या यांचीहि उपासना विशेष चाले. **दोन खांद्यावर दोन व मानेवर एक असे ३ पहिलवान घेऊन उभे राहिलेल्या राजे लक्ष्मणराव भोसल्यांचे** चित्र उपलब्ध आहे. आणि **जानोजी भोसल्यांचा** एक **मुस्लिम पहिलवान मोरो-**पंतांच्या आर्या घडघड म्हणून त्यांचा अर्थ सांगावयाचा! **येथे भोसल्यांच्या राज्यात गोवधबंदी होती, पेशवाईत गोवधबंदीसह मद्यबंदी देखील होती!** तात्पर्य, गेल्या अडीच हजार वर्षातील ह्या प्रांताच्या इतिहासावर विदर्भ








संशोधन मंडळाने विपुल प्रकाश टाकला. 'इतिहासप्रदीपेन मोहावरणघातिना। लोकगर्भगृहं कृत्स्नं विधिवत् सम्प्रकाशितम्।।' अज्ञानाचे आवरण दूर करणाऱ्या इतिहास दिव्याने लोकजीवनाचा गाभारा वि. सं. मंडळाने उत्तमप्रकारे कसा उजळला हे येथे संक्षेपाने सांगितले. महाभारतातले हे व्यासवचन मंडळाच्या कामगिरी संदर्भात सहजच लागू पडते. हेहि एकापरी राष्ट्रकार्यच्च आहे. **कारण इतिहास हा भूतकाळाचा वर्तमानाशी सातत्याने सुरू असलेला संवाद असतो.**

☆☆☆

---

# १८५७ चा उठाव : नवे संशोधन, नवे अन्वयार्थ

- प्रा. जास्वंदी वांबुरकर

इतिहास म्हणजे निव्वळ घटनावर्णन ही संकल्पना आता कालबाह्य झालेली आहे. 'इतिहास म्हणजे वादग्रस्त घटितांच्या गटाने वेढलेला अन्वयार्थाचा गाभा' ही इ. एच. कार यांनी केलेली केलेली इतिहासाची व्याख्या अगदी समर्पक आहे. कोणत्याही इतिहासकाराने/कर्तीने केलेले ऐतिहासिक संशोधन त्याचे/तिचे सामाजिक स्थान, देश, वर्ग, जात, प्रदेश, काळ, धर्म, लिंगभाव इ. गोष्टींमुळे प्रभावित झालेले असते. त्यामुळेच एकाच ऐतिहासिक घटिताचे अनेक नवनवे अन्वयार्थ निर्माण होतात. इतिहास लिहिणे हाच इतिहास घडविण्याचा एक मार्ग आहे, असे एका तत्त्वज्ञाने म्हटले आहे. इतिहासलेखन हे वर्तमानकालीन राजकारणातील वैचारिक संघर्षाचे एक महत्त्वपूर्ण साधन असते.

१८५७ चा उठाव ही भारताच्या इतिहासातील एक अतिशय वादग्रस्त घटना आहे. भारतातील वासाहतिक ब्रिटिश राज्यातील ब्रिटिश अधिकारी ते स्वतंत्र भारतातील वंचितगटांचा इतिहास लिहिणारे इतिहासकार अशा विविध स्तरातून १८५७ च्या उठावावर नवनवे भाष्य केले गेले. १९ वे शतक ते आजतागायत भारतीय राजकारणाच्या क्षितिजावर उदयाला आलेल्या विविध विचारप्रवाहांनी हे इतिहासलेखन प्रभावित झालेले होते. २००७ साली या उठावाला दीडशे वर्षे पूर्ण झाली. भारतभर या उठावाचे १५० वे जन्मशताब्दी वर्ष साजरे झाले. या निमित्ताने या उठावावर अनेक नवे संशोधन पुढे आले. प्रस्तुत लेखामध्ये १८५७ च्या उठावाविषयीच्या महत्त्वपूर्ण ऐतिहासिक संशोधनाचा परामर्श घेण्यात आलेला आहे.

### १८५७ चा उठाव : शिपायांचे बंड

१८५७ च्या उठावाला सुरुवात झाल्यापासूनच या उठावाच्या स्वरूपाविषयी वादविवाद सुरू झाले. ईस्ट इंडिया कंपनीचे भारतातील राज्य हे 'कायद्याचे राज्य' (rule of law) आहे, निधर्मी राज्य आहे, अशी मिथके या राजवटीचे प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठी प्रसृत करण्यात आली होती. ब्रिटिशांचे राज्य हे 'कल्याणकारी राज्य' (welfare state) आहे; तर ब्रिटिशपूर्वकालीन भारतातील राज्य हे अराजकतेचे (oriental despotism) होते, अशा प्रतिमा निर्माण करण्यात आल्या होत्या. मात्र १८५७ च्या उठावाने ब्रिटिश राजवटीबाबत भारतीय जनतेतील असंतोष अतिशय विद्रोही स्वरूपात व्यक्त झाला. तेव्हा १८५७ च्या उठावावरील लिखाणातून भारतातच नव्हे तर भारताबाहेर डागाळलेली ईस्ट इंडिया कंपनीच्या राजवटीची प्रतिमा उंचावण्याचे प्रयत्न झाले.

या उठावासंबंधी ब्रिटिश प्रशासक, साम्राज्यवादी इतिहासकार यांनी बरीच पुस्तके लिहिली. त्यांपैकी चार्ल्स बॉल, जे. डब्ल्यू. के व जी. बी. मॅलेसन यांचे लेखन पायाभूत मानले जाते.[१] १८५७ चा उठाव म्हणजे 'शिपायांचे बंड' हा दृष्टिकोण प्रसृत व लोकप्रिय करण्याची कामगिरी या इतिहासकारांनी पार पाडली. हे ठसविण्यामागे त्यांचे दोन राजकीय हेतू होते : (१) या उठावाचा बीमोड करण्यासाठी ब्रिटिश राजवटीला अधिमान्यता मिळवून देणे व (२) ब्रिटिशांबाबतचा (ईस्ट इंडिया कंपनीबाबतचा) असंतोष सर्वदूर भारतभर पसरलेला नाही; हा उठाव म्हणजे केवळ बंगाल आर्मीतील असंतोषाचा उद्रेक आहे, असे सिद्ध करणे. वॉल व के या इतिहासकारांनी यासाठी काडतुस प्रकरण अतिशय भडक स्वरूपात मांडले. १८५६ साली भारतीय सैनिकांच्या हाती लांब पल्ल्याच्या बंदुका व त्यामध्ये वापरायची नवी काडतुसे देण्यात आली. या काडतुसांवरील आवरण दातांनी तोडावे लागे. काडतुसांवरील आवरणाला गाईची व डुकराची चरबी लावण्यात आलेली आहे, या बातमीमुळे भारतीय सैनिकांमध्ये प्रक्षोभ निर्माण झाला, असा हा सिद्धान्त आहे. या सिद्धान्तामध्ये तथ्य असले तरी ते उठावाचे केवळ तात्कालिक कारण होते, हे विसरून चालता येत नाही. या सिद्धान्ताद्वारे भारतीयांच्या जात व धर्म जाणिवा किती प्रखर आहेत, अशा प्रतिमा घट्ट करण्याचा प्रयत्न झाला. ब्रिटिशपूर्वकाळात






समुद्र ओलांडून जायचे की नाही, ही मुभा सैनिकांना होती; ब्रिटिशकाळात मात्र भारतीय सैनिकांना सक्तीने भारताबाहेर जावे लागे. सैनिकांमधील असंतोषाचे हेही एक कारण मांडण्यात आले. मात्र, मध्ययुगीन काळातील भारताच्या परदेशांशी समुद्रामार्फत होणाऱ्या मोठ्या व्यापारी उलाढाली पाहता, जातिव्यवस्थेने घातलेल्या या बंदीला व्यवहारात खूप महत्त्व नव्हते, ते उघड आहे.

ब्रिटिश इतिहासकारांनी १८५७ च्या संग्रामाला म्युटिनी (शिपायांचे बंड, रिव्होल्ट (उठाव) व रिबेलियन (बंड) अशी नावे दिली. ईस्ट इंडिया कंपनीच्या समर्थकांनी ते 'शिपायांचे बंड' म्हणून जाहीर केले. मात्र इंग्लंडमधील भांडवलदारांच्या प्रतिनिधींनी हा राष्ट्रव्यापी उठाव आहे, अशी भूमिका घेतली आणि ईस्ट इंडिया कंपनीचे अधिकार काढून राणीची सत्ता स्थापन करावी, अशी जोरदार मागणी केली. ईस्ट इंडिया कंपनीला भारताशी होत असलेल्या नफ्याचा, ब्रिटनमधील व्यापारी कंपन्यांना हेवा वाटत होता. भारतात येऊन व्यापार करण्यास या कंपन्या उत्सुक होत्या. १८५७ च्या उठावाचे निमित्त साधून भांडवलदारांच्या प्रतिनिधींनी ईस्ट इंडिया कंपनीची मक्तेदारी संपुष्टात आणण्याचे प्रयत्न केले. १८५७ च्या जुलै महिन्यात ब्रिटिश लोकसभेपुढे बेंजामिन डिझरायली याने असे विधान केले : "साम्राज्याचा उदय व पतन या गोष्टी चरबी लावलेल्या काडतुसांमुळे होत नाहीत. अनेक साचलेल्या पुरेशा कारणांमुळे असे परिणाम दिसून येतात."[२]

या उठावाचे पडसाद भारताबाहेर आशियाई व युरोपीय देशांमध्येही उमटले. 'द न्यूयॉर्क डेली ट्रिब्यून'च्या अंकात (४ ऑगस्ट १८५७) बंड सुरू असतानाच, कार्ल मार्क्स याने 'भारताचे पहिले स्वातंत्र्ययुद्ध' असा त्याचा गौरव केला.[३] ब्रिटिशांनी केलेल्या भारताच्या आर्थिक शोषणाविरुद्धचा तो उद्रेक होता, असा निष्कर्ष त्याने मांडला. कार्ल मार्क्स व फ्रेडरिक ऐंगल्स यांनी, या उठावामध्ये हिंदू, मुस्लिम व इतरधर्मीय जमातींनी दाखविलेली एकजूट अधोरेखित केली. ऐंगल्सने अतिशय प्रखर शब्दांत ब्रिटिशांनी उठावाच्या दरम्यान केलेल्या क्रौर्यावर भाष्य केले[४] : "एकोणिसाव्या शतकात सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या अख्ख्या युरोपात व अमेरिकेत ब्रिटिश फौजेएवढी पाशवी वृत्तीची फौज कोठेही नाही. लूट, हिंसा व कत्तलीसारख्या ज्या गोष्टींना इतरत्र पूर्ण बंदी असते, त्या गोष्टी ब्रिटिश सैनिकांच्याबाबतीत कालसिद्ध हक्काच्या बनल्या आहेत."

खुद्द इंग्लंडमध्ये या काळात चार्टिस्टांची चळवळ सुरू होती. प्रसिद्ध चार्टिस्ट नेते अर्नेस्ट जोन्स यांनी ब्रिटिशांनी चालविलेल्या भारताच्या आर्थिक शोषणाचे स्वरूप उघडपणे मांडले आणि या उठावाला आपला पाठिंबा जाहीर केला.

भारतामध्ये समकालीन विविध नेते, सुधारक व पक्ष यांनी या उठावाविषयी वेगवेगळ्या प्रतिक्रिया दिल्या. बहुजन चळवळीचे नेते महात्मा फुले यांनी 'भटपांड्यांचे उठाव' म्हणून ते निकालात काढले. ते म्हणतात,[५] "त्या बंडात इंग्रजी राज्य गेले असते तर इतिहासाची पुनरावृत्ती घडली असती. ब्राह्मण पेशव्यांच्या राज्याचा पुन्हा अवतार झाला असता. श्रुति-स्मृति, पुराणातील हिंदू संस्कृतीला पुन्हा जोर चढून शूद्र व अतिशूद्र असलेल्या बहुसंख्य जनतेची उद्धाराची आशा जी इंग्रजी राज्यामुळे अंकुरित झाली आहे, ती पार ठार झाली असती." ब्रिटिश राजवटीचे शोषक स्वरूप तसेच तिचे अभिजनांचे अनुनय करण्याचे धोरण ओळखलेले असूनही ब्रिटिश राजवटीमुळे भारतीय स्थितीशील समाजव्यवस्थेत होत असलेले भौतिक बदल आणि शूद्रातिशूद्रांसाठी दिसत असलेला सामाजिक अवकाश या कारणांमुळे ब्रिटिशांचे राज्य स्वागतार्ह वाटल्यास त्यात काही वावगे नव्हते.

१८५८ साली सर सय्यद अहमद खान यांनी 'असबद-ए-बागवान-ए-हिंद'[६] या शीर्षकाचा एक ग्रंथ लिहिला. १८५७ च्या उठावाची कारणमीमांसा करणारे सर सय्यद अहमद खान हे पहिले भारतीय होते. मात्र त्यांच्या या ग्रंथाची फारशी दखल घेतली गेली नाही. १८५७ चा उठाव हे शिपायांचे बंड नव्हते; तर साम्राज्यशाही व्यवस्थेविरुद्धचा तो पहिला उद्रेक होता, हे सर्वप्रथम त्यांनी अधोरेखित केले. ब्रिटिश राजवटीच्या आर्थिक शोषणामुळे भारतीय अर्थव्यवस्थेवर कसे आघात झाले, जमीनदार, तालुकदार, शेतकरी-कारागीर इ. सर्वच वर्ग कसे भरडले गेले, याची मीमांसा त्यांनी या ग्रंथात केली. त्यादृष्टीने त्यांचा हा ग्रंथ महत्त्वपूर्ण होय.

१८८५ साली भारतीय राष्ट्रीय सभेची स्थापना

झाली. या सभेने १८५७ च्या उठावाचा धिक्कार केला. राष्ट्रीय सभा ही उदयोन्मुख भांडवलशाही व लोकशाही राज्यपद्धतीचा पुरस्कार करणाऱ्या भारतीय मध्यमवर्गाची प्रातिनिधिक सभा होती. १८५७ चा उठाव हा पारंपरिक सरंजामशाही व राजेशाही यांच्या पुनर्स्थापनेसाठी केलेला लढा होता, अशी या उठावाची राष्ट्रीय सभेतील नेत्यांनी संभावना केली.

विसाव्या शतकाच्या सुरुवातीला भारतीय राष्ट्रवादी नेते या उठावाकडे आकर्षित झाले. १९०७ साली १८५७ च्या उठावाला पन्नास वर्षे पूर्ण झाली. या पन्नास वर्षांमध्ये या विषयावर तीस एक ग्रंथ लिहिले गेले.

**१८५७ चा उठाव : एक स्वातंत्र्यसमर**

१९०८ साली विनायक दामोदर सावरकरांनी 'सत्तावनचे स्वातंत्र्यसमर' हा साडेपाचशे पानांचा ग्रंथ मराठी भाषेत लिहिला.[७] मात्र सरकार व पोलिसांच्या छळाच्या भीतीने तो भारतात छापायला कोणीच तयार झाले नाही. त्याचे इंग्रजी भाषांतर करून सावरकरांनी तो ग्रंथ हॉलंडमध्ये छापला व जगभर पाठविला. दुर्दैवाने या ग्रंथाची मराठी प्रत गहाळ झाली. इंग्रज इतिहासकारांचे या उठावाबाबतचे 'शिपायांचे बंड' हे मत त्यांनी नाकारले. केवळ काडतुस-प्रकरणामुळे सैनिकांमध्ये असंतोष असता तर या उठावात नानासाहेब, मुघल सम्राट, झाशीची राणी, खान बहादूर खान, तात्या टोपे सामील झाले नसते, असा युक्तिवाद त्यांनी केला.

अन्यत्र एका लेखामध्ये हिंदूंचा इतिहास कसा लिहावा, हे मांडताना सावरकरांनी म्हटले आहे की, "... आमच्या आपसातील कलहाचा कोळसा पुन्हा पुन्हा उगाच ऊगाळत बसण्याचे शक्यतो टाळावे आणि ज्या घटनांच्या वर्णनाने आजचे आपले हिंदूसंघटनाचे कार्य अधिक बळकट होईल, हिंदूंची परस्परप्रीती, सहकार्य एकराष्ट्रीयत्वाची भावना ही वाढीस लागतील, अशाच आपल्या सर्वांच्या गौरवाच्या गोष्टी, आज उपकारक ठरणाऱ्या राष्ट्रीय कुलकथा आजच्या लेखातून उल्लेखिल्या जाणे अगदी आवश्यक झाले तरीही मागे झालेले – गेलेले कुलकलह उल्लेखावयाचे तर हळुवार हाताने अवश्य तितकेच निर्देशिले जावे."[८]

या उठावाच्या मुळाशी स्वधर्म व स्वराज्य ही दोन तत्त्वे होती, असा निष्कर्ष सावरकरांनी मांडला. त्यांच्या ग्रंथाची सुरुवातच स्वामी रामदासांच्या पुढील काव्यपंक्तीने होते :

"धर्मासाठी मरावे, मरोनी अवघ्यांसी मारावे।
मारिता मारिता घ्यावे, राज्य आपुले।।"

या उठावामध्ये हिंदू-मुस्लिमांनी दाखविलेली एकजूट व बंधुत्व हे केवळ अभूतपूर्व होते, अशी भूमिका या ग्रंथात त्यांनी मांडली. मात्र १८५७ च्या उठावाबाबत त्यांनी ही भूमिका घेतली असली तरी हिंदूराष्ट्रनिर्मितीच्या संदर्भात पुढील काळात त्यांनी मुस्लिमांना शत्रुस्थानी मानले, हे सर्वज्ञातच आहे.

सावरकरांच्या १८५७ च्या उठावावरील ग्रंथामधून त्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानाविषयी काही ठोकताळे बांधता येतात.[९] राजकारण हे मित्र आणि शत्रू या गटांमध्ये विभागलेले असते. प्रस्तुत उठावाच्या संदर्भात शत्रू म्हणून ब्रिटिश आहेत. स्वधर्म व स्वराज्याचे रक्षण करण्यासाठी हिंसा ही वैध आहे; साधनशुचितेचा आग्रह धरण्याची गरज नाही, अशा त्यांच्या भूमिकेमुळेच या ग्रंथात ब्रिटिश सैन्य, अधिकारी एवढेच काय स्त्रिया वा मुले यांच्या हत्येची वर्णने खच्चून भरलेली आहेत. या जगामध्ये समता, न्याय वा स्वातंत्र्य मिळवायचे असेल तर बंड, क्रांती, उठाव व सूड ही वैध आयुधे आहेत, ही त्यांची धारणा या ग्रंथातून स्पष्ट होते. तत्कालीन क्रांतिकारी चळवळीचे स्फुल्लिंग पेटविण्याचे काम या पुस्तकाने केले. नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी हा ग्रंथ आपल्या फौजेतील सैनिकांसाठी पाठ्यपुस्तक म्हणून नेमला होता.

एम. एन. रॉय व रजनी पाम दत्त यांनी मार्क्सवादी परिप्रेक्ष्यातून १८५७ च्या उठावाची मांडणी करण्याचा प्रयत्न केला.[१०] 'मावळत्या सरंजामी सत्तेचा डोलारा सांभाळण्याचा शेवटचा निष्फळ प्रयत्न', असा या उठावासंबंधी रॉय यांनी निष्कर्ष काढला. त्यांच्या मते, जुनी सरंजामी व्यवस्था आणि नव्याने उदयाला येत असलेली व्यापारी भांडवलशाही यांच्यातील तो संघर्ष होता. रजनी पाम दत्त यांच्या मते, या उठावात शेतकऱ्यांचा मोठ्या प्रमाणावर सहभाग होता; मात्र जुनी सरंजामीव्यवस्था टिकवून ठेवण्यातच त्यांना स्वारस्य होते.










**राष्ट्रवादी इतिहासलेखन**[११]

भारत स्वतंत्र झाल्यावर १८५७ च्या उठावासंबंधीची अनेक कागदपत्रे, अभिलेखागारातील शासकीय अहवाल, ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या नोंदी, पत्रव्यवहार, रोजनिशी इ. मौलिक साधने संशोधकांना उपलब्ध झाली. एस. बी. चौधरी, एस. एन. सेन, आर. सी. मजुमदार व के. के. दत्ता या इतिहासकारांचे १८५७ विषयक संशोधन राष्ट्रवादी इतिहासलेखनामध्ये पायाभूत मानले जाते. यांच्या लेखनावर राष्ट्रवादी चळवळीच्या आशयाचा प्रभाव स्पष्टपणे जाणवतो. त्यांपैकी काहींनी १८५७ च्या उठावाला भारतीय राष्ट्रवादी चळवळीचा आरंभबिंदू मानले तर काहींना १८५७ च्या उठावात राष्ट्रवादाचा आशय सापडला. या उठावातील संघर्ष 'ब्रिटिश विरुद्ध भारतीय' अशा ढोबळ कोटिक्रमांमध्ये न मांडता भारतीय अर्थव्यवस्थेतील वर्गीय पातळीवरचा अंतर्विरोध (अभिजन–सावकार, जमीनदार व बहुजन शेतकरी, आदिवासी इ.) त्यांनी अधोरेखित केला, हे त्यांचे महत्त्वपूर्ण योगदान आहे.

एस. बी. चौधरी यांनी हा उठाव शिपायांचे बंड व नागरी उठाव अशा दोन्ही स्वरूपात आविष्कृत झाला, अशी अधिक तौलनिक मांडणी केली. नागरी उठाव ही प्रामुख्याने तालुकदारी चळवळ होती, तरी शेतकरी व तथाकथित निम्न जातींचा व समाजाच्या सर्व स्तरातील लोकांचा सहभाग या लढ्यात होता, अशी मांडणी त्यांनी केली. या उठावातील अनेक नेते आपापल्या प्रांतांच्या सीमा ओलांडून ब्रिटिशांविरुद्ध लढले. सारांश, जात, धर्म व प्रदेश यांच्या सीमारेषा ओलांडून भारतीयांनी उठावाच्यावेळी सामाजिक बंधुभावाचे प्रकटीकरण केले, असे चौधरी यांना वाटते.

एस. एन. सेन यांचा तर शासकीय अनुदान मिळालेला ग्रंथ होता. १९५७ साली या उठावाला शंभर वर्षे पूर्ण झाली. साहजिकच या ग्रंथाद्वारे भारतीय राष्ट्रवादाची विजयश्री साजरी करण्याचा हेतू होता. एस. एन. सेन व के. के. दत्ता या दोन्ही इतिहासकारांनी 'जनसामान्यांचा उठाव' असे या उठावाचे स्वरूप अधोरेखित केले. चपाती व कमल–पुष्पाद्वारे या उठावाचे संघटन कसे होत असे, याचे परीक्षण सेन यांनी केले. आर. सी. मजुमदार यांनी १८५७ च्या उठावाविषयी आपल्या संशोधनात काही ठळक निरीक्षणे नोंदविली :

(१) या लढ्यात सामील झालेल्या विविध सत्ता वा गट हे आपापल्या वैयक्तिक हितसंबंधांसाठी लढत होते. त्या सर्वांचे म्हणून एक समान उद्दिष्ट नव्हते. त्यांच्यामध्ये संज्ञापनाचा अभाव होता. क्वचित या उठावात गुंडगिरीचाही आविष्कार झाला.

(२) या उठावातील चार महत्त्वपूर्ण नेते–बहादुरशहा, नाना साहेब, झाशीची राणी, लक्ष्मीबाई व कुंवरसिंह हे जनतेचे नैसर्गिक नेते मानायचे का, असा प्रश्न त्यांनी उपस्थित केला. किंबहुना ते जनतेचे नैसर्गिक नेते नाहीतच, अशी त्यांची भूमिका आहे.

(३) या उठावाबाबत हिंदू–मुस्लिम ऐक्याचा उद्‌घोष केला जातो; त्याबद्दलही ठिकठिकाणी विशेषतः संयुक्त प्रांतामध्ये झालेल्या जातीय दंगलींकडे त्यांनी लक्ष वेधले.

(४) हा उठाव म्हणजे एक राष्ट्रव्यापी स्वातंत्र्यसमर होते, हे मत त्यांना मान्य नाही. राष्ट्रवाद किंवा देशभक्ती-सारखी भावना १८५७ किंवा तत्पूर्वी विकसित होणे शक्य नाही, असा प्रतिवाद त्यांनी केला. भारतातील काही सत्ता उदा. शीख, गुरखा या उठावाच्या काळात ब्रिटिशांच्या बाजूने लढल्या. भौगोलिकदृष्ट्याही बंगाल, आसाम, ओरिसा, राजस्थान, पंजाब, बिहार व मध्य-प्रदेशाचा बहुतांश भाग तसेच नर्मदेच्या पलीकडील दक्षिण भारत हा प्रदेश उठावापासून अलिप्त होता. त्यामुळे या उठावाची व्याप्ती 'राष्ट्रीय' नव्हती.

१९५७ साली पी. सी. जोशी यांनी संपादित केलेला '1857 : A Symposium' हा ग्रंथ[१२] प्रकाशित झाला. हाच ग्रंथ नॅशनल बुक ट्रस्टने २००७ साली पुनर्प्रकाशित केला. या ग्रंथाने या उठावासंबंधी अनेक नवीन विषय व अन्वयार्थ पुढे आणले. या ग्रंथाचे तीन विभाग आहेत. पहिल्या विभागात उठावाच्या स्वरूपाविषयी तात्त्विक चर्चा करणारे लेख आहेत. दुसऱ्या विभागात विविध भाषांमधील साहित्यामध्ये या उठावाचे चित्रण कसे केले गेले आहे, यांवर लेख आहेत. तिसऱ्या विभागात या उठावाबाबत भारताबाहेर–युरोपीय व आशियाई देशांमध्ये काय प्रतिक्रिया उमटली, याची चर्चा केलेली आहे.

पहिल्या विभागातील तल्मिझ खल्दून यांच्या लेखात उठावाच्या स्वरूपाची चर्चा केलेली आहे.[१३] हा उठाव








म्हणजे एतद्देशीय जमीनदारी आणि परकीय साम्राज्यशाही-विरुद्धचा शेतकऱ्यांचा लढा होता, असा निष्कर्ष त्यांनी मांडला. या दीर्घ लेखामध्ये अनेक प्राथमिक साधनांच्या आधारे नवीन जमीन महसूल व्यवस्था, नवीन प्रशासन-पद्धती व न्यायव्यवस्था यांमुळे भारतीय शेतकरी कसा नागवला गेला, याची कारणमीमांसा केली आहे.

पी. सी. जोशी[१४] यांनी आपल्या लेखामध्ये 'हा उठाव म्हणजे सरंजामशाहीविरुद्धचे शेतकऱ्यांचे युद्ध होते, ही भूमिका नाकारली आहे. त्यांचे काही ठळक निष्कर्ष हे १८५७ च्या उठावावरील महत्त्वपूर्ण अन्वयार्थ आहेत :

(१) आपल्या क्रांतिकारी पूर्वजांची भिस्त मुघल बादशहा, मराठा पेशवा इ. नेत्यांवर होती, ही त्यांच्या राष्ट्रवादी जाणिवेची मर्यादा होती. मात्र त्यांना मागासलेले वा प्रति-क्रियात्मक (reactionary) मानणे चूक आहे.

(२) भारतीय उठावकरी ब्रिटिशपूर्वकालीन सरंजामी एका-धिकारशाहीची पुनर्स्थापना करीत नव्हते. किंबहुना एक नवीन प्रकारची, लोकप्रिय लोकशाही सदृश्य व्यवस्था बहादूरशाहाच्या अंमलाखाली त्यांना अभिप्रेत होती. परकीय जुलमी राज्यकर्त्यांपेक्षा आपल्या राज्यकर्त्यांना पसंती देणे, ही अतिशय सशक्त राष्ट्रीय भावना होती. अर्थात विसाव्या शतकातील वासाहतिक चळवळी किंवा भारतीय राष्ट्रीय स्वातंत्र्य चळवळीकडे जे आधुनिक राजकीय तत्त्वज्ञान होते, ते या उठावकऱ्यांकडे नव्हते आणि असणे शक्यही नव्हते. मात्र १८५७ च्या राष्ट्रीय उठावाचे मूल्यमापन आधुनिक राष्ट्रीय चळवळीच्या परीप्रेक्ष्यातून करणे अनैतिहासिकच नव्हे तर अशास्त्रीयही ठरेल.

(३) मात्र या उठावाच्या काही मर्यादाही होत्या. या उठावामध्ये सरंजामी नेत्यांची भूमिका बदलत राहिली. उठावाच्या पहिल्या टप्प्यामध्ये ब्रिटिश आणि उठावकरी यांमध्ये कोणाचे पारडे जड होत आहे, याची शहानिशा करत सरंजामी नेते तटस्थ राहिले. दुसऱ्या टप्प्यात ते उठावकऱ्यांच्या बाजूने हिरिरीने लढले. मात्र तिसऱ्या टप्प्यात जसजसे उठावकरी पराभूत व्हायला लागले, तसतशी या सरंजामी नेत्यांनी ब्रिटिशांच्या बाजूने लढायला सुरुवात केली.

(४) १८५७ चा उठाव हा १९ व्या शतकातील ब्रिटिशां-विरुद्धचा सर्वात शक्तिशाली उद्रेक होता; मात्र भारतीयांना भारतीयांविरुद्ध वापरून ब्रिटिशांनी तो मोडून काढला.

(५) काही प्रादेशिक अभ्यासांवरून असे सिद्ध झाले आहे की, ग्रामीण समाज नव्या जमीन महसूल व्यवस्थे-विरुद्ध उठावात सामील झाला. या समाजाने ब्रिटिश राजवटीबरोबरच सावकार, जमीनदार, सरंजामदार यांनाही लक्ष्य केले. म्हणून १८५७ चा उठाव हा सरंजामीव्यवस्थेची पुनर्स्थापना करण्यासाठीचा प्रयत्न होता, हा पंडित नेहरू, आर. सी. मजुमदार, एस. एन. सेन यांचा निष्कर्ष अयोग्य आहे. सरंजामदारांव्यतिरिक्त या उठावामध्ये ज्यांनी निर्णायक भूमिका बजावली, अशा अन्य सामाजिक शक्तीही या उठावामध्ये होत्या.

या ग्रंथाच्या दुसऱ्या विभागात पाच लेख आहेत. १८५७ च्या उठावाचे हिंदी, उर्दू साहित्य, मिर्झा गालीब यांचे साहित्य, लोकसाहित्य यांमध्ये कसे प्रतिबिंब पडले, याचे विश्लेषण या लेखांमध्ये केलेले आहे.

१९ व्या शतकातील प्रबोधनाच्या चळवळीचा आविष्कार म्हणून अनेक भारतीय भाषांमधून आधुनिक साहित्य निर्माण झाले. नवे साहित्यिक घाट व आधुनिकता, राष्ट्रवाद या नवीन तत्त्वांची अभिव्यक्ती करणारे साहित्य या काळात निर्माण होऊ लागले. या साहित्याने सामाजिक अंतःसत्वाच्या निर्मितीमध्ये मोलाचे योगदान दिले.

भरतेंदू, द्विवेदी माखनलाल चतुर्वेदी व सुभद्राकुमारी चौहान यांच्या कवितांमध्ये १८५७ विषयक जाणिवा कशा व्यक्त झाल्या आहेत याची चर्चा हिंदी साहित्यावरील लेखात पी. सी. गुप्ता यांनी केली आहे.[१५] तसेच प्रेमचंद, राहूल, यशपाल, रंगेय राघव, नागार्जुन यांच्या १८५७ वरील कादंबऱ्यांचे विश्लेषणही त्यांनी या लेखात केले आहे. प्रखर राष्ट्रवादी जाणिवा व्यक्त करणारे हे साहित्य विसाव्या शतकातील क्रांतिकारी चळवळीला उत्तेजन देणारे ठरले.

मिर्झा गालिब यांची पत्रे, त्यांची रोजनिशी ('दस्तम्बो'), सर सय्यद अहमद यांचा 'तारिख-ए-सरकाशी-ए-बिंजोर' हा ग्रंथ, आगा हज्जू यांची 'शरफस' ही लखनऊच्या ताब्यावरील दीर्घ कविता, वाजिद अली शाहा व बहादूरशहा जफर यांच्या कविता या सर्व उर्दू साहित्याची १८५७ च्या उठावासंदर्भात एका लेखात चर्चा








केलेली आहे.[१६] ती मुळातून वाचण्यासारखी आहे.

के. एम. अश्रफ यांचा मिर्झा गालीब यांच्यावरील लेख त्यांच्याविषयी नवा दृष्टिकोण देतो.[१७] मिर्झा गालिब हे सर्वसाधारणपणे एक थोर उर्दू कवी म्हणून ज्ञात आहेत. मात्र मुघल बादशाहा बहादूरशाहा जफरने मुघल राजघराण्याचा अधिकृत (Official) इतिहास लिहिण्याची कामगिरी त्यांच्यावर सोपविली होती, हे फारसे कुणाला ठाऊक नसते. त्यांच्या रोजनिशीत ११ मे १८५७ पासूनच्या नोंदी आहेत. ही जबाबदारी मोठी जोखमीची होती. गालिब आणि मुघल बादशहा यांच्यातील घनिष्ठ संबंधांची ब्रिटिश सरकारला चांगली कल्पना होती. त्यामुळे गालिब यांनी अतिशय काळजीपूर्वक या रोजनिशीत नोंदी केल्या. के. एम. अश्रफ यांच्या मते, 'दस्ताम्बो' ही रोजनिशी हा या उठावासंबंधीचा एक अतिशय अमूल्य असा दस्तऐवज आहे.

या विभागातील सर्वात वाचनीय लेख म्हणजे पी. सी. जोशीलिखित 'फोक साँग्ज ऑन एटीन फिफ्टीसेवन' (Folk Songs on 1857) हा होय.[१८] पोवाडे, लोकगीते, अंगाईगीते या विविध माध्यमांनी १८५७ च्या उठावाच्या स्मृती कशा चिरंतन केल्या आहेत, याची चर्चा लेखकाने या लेखात केली आहे. या गीतांचे कर्ते ज्ञात नाहीत. उस्फूर्तता हा या गीतांचा प्राण आहे. उत्तर भारतातील विविध ठिकाणांहून संकलित केलेली ही लोकगीते, जनसामान्यांमध्ये या उठावाचा ठसा किती खोलवर उमटला होता, याची साक्ष देतात. वंचितांच्या इतिहासलेखनामध्ये लोकगीते या साधनांना खूप महत्त्व आहे. उठावातील विविध नेते राणी लक्ष्मीबाई, कुंवरसिंह, राणा बेनी माधो यांच्या शौर्याच्या गाथा सांगणारी अनेक लोकगीते आहेत; देशभक्ती व राष्ट्रप्रेम व्यक्त करणारी गीते आहेत. 'खूब लढी मर्दानी, झांशीवाली रानी', ही नंतरच्या काळातील सुभद्रा कुमारी चौहान यांची सुप्रसिद्ध कविता हिंदी लोकगीतातील काव्यपंक्तीमुळे कशी प्रभावित झालेली आहे, हे या लेखात स्पष्ट होते.

**जनसामान्यांचे उठाव :**

१८५७ च्या उठावावर जे नवीन संशोधन झालेले आहे, त्यांमध्ये सर्वात स्वागतार्ह म्हणजे जनसामान्यांशी या उठावाचे नाते सांगणारे संशोधन होय. इतिहास म्हणजे केवळ थोरामोठ्यांची चरित्रे ही संकल्पना आता कालबाह्य झाली आहे. शेतकरी, कामगार, दलित, आदिवासी, स्त्रिया अशा भारतीय व्यवस्थेमध्ये युगानुयुगे वंचित राहिलेल्या गटांचे इतिहासातील योगदान अधोरेखित करणारी 'सबाल्र्टन इतिहास' किंवा 'दुय्यम समूहांचा इतिहास' अशी शाखा अवतीर्ण झाली आहे. १८५७ चा उठाव हा जनसामान्यांचा उठाव होता, या दृष्टिकोणातून इरिक स्टोक्स, रूद्रांगशू मुखर्जी, तप्ती रॉय, गौतम भद्रा, के. एस. सिंग, बद्री नारायण, रजत कांतारे, चारू गुप्ता, लता सिंग इ. संशोधकांचे लेखन यादृष्टीने महत्त्वपूर्ण आहे.

इरिक स्टोक्स यांनी १८५७ च्या उठावाविषयी दोन पुस्तके लिहिली.[१९] पहिल्या पुस्तकात (१९७८) त्यांनी या उठावाचे अभिजन स्वरूप (जातीय पातळीवरचे) विशद केले. त्यांच्या मते, या उठावामध्ये शेतकऱ्यांचा सहभाग फारसा नव्हता आणि असल्यासही अभिजनांचे अनुकरण असेच त्याचे स्वरूप होते. १९८६ मध्ये प्रकाशित झालेल्या दुसऱ्या पुस्तकात त्यांचे निष्कर्ष त्यांनी बदलले. 'द पिझंट आर्म : द इंडिया रिव्होल्ट ऑफ एटीन फिफ्टीसेवन' (The Peasant Armed : The India Revolt of 1857) हे शीर्षकही मोठे सूचक आहे. १८५७ चा उठाव ही एक चळवळ नव्हती तर प्रदेशागणिक तिच्यामध्ये वैविध्य होते, हे त्यांचे प्रमेय आहे. 'जात' हा कोटिक्रम केंद्रस्थानी न ठेवता वसाहतवादाचे वेगवेगळया प्रदेशांवर कसे वेगवेगळे परिणाम झाले आणि त्यामुळे उठावाचे स्वरूपही कसे विविधतापूर्ण राहिले, अशी मांडणी त्यांनी केली आहे. आर्थिक परिणामांबरोबरच पर्यावरण, संस्कृती, लोकांची मानसिकता यांवरही वसाहतवादाचे कसे दूरगामी परिणाम झाले आणि त्यामुळेच जनसामान्य, शेतकरी उठावामध्ये सहभागी झाले, याची चर्चा त्यांनी या ग्रंथात केली आहे.

रूदांगशू मुखर्जी[२०] यांनी अवधमधील ब्रिटिशविरोधी उठावामध्ये शेतकरी कसे अग्रस्थानी होते, यावर प्रकाश टाकला आहे. येथील उठावाला तालुकदारांचे नेतृत्व लाभले असले तरी त्या उठावाचे खरे सामर्थ्य शेतकरी व जनसामान्य यांच्या सक्रिय सहभागातच होते, असा त्यांचा निष्कर्ष आहे. ज्या भागात तालुकदार ब्रिटिशांशी

निष्ठावंत राहिले, त्याही भागात शेतकरी उठावात सामील झाले; उठावातील सैनिकांचा सहभाग लक्षात घेता शिपाई हे गणवेषातील शेतकरी होते, हे मुखर्जी यांनी अधोरेखित केले आहे.

तप्ती रॉय[२१] यांनी बुंदेलखंड भागातील खेड्यापाड्यांमध्ये १८५७ च्या उठावाचा उद्रेक कसा झाला, यावर संशोधन केले आहे. सरकारी अधिकारी, पतपेढ्यांचे मालक, महाजन यांना शेतकऱ्यांनी आपल्या उठावाचे लक्ष्य केले. सरकारी कागदपत्रे जाळून टाकणे, शेजारच्या गावांमध्ये लूटमार करणे याही गोष्टी गावकऱ्यांनी केल्या. उठावाच्या दुसऱ्या टप्प्यामध्ये वासाहतिक सत्तेमध्ये ज्या एतद्देशीय गटांचे हितसंबंध गुंतलेले आहेत, अशा वर्गांनाही उठावाचे लक्ष्य केले. व्यापारी, पतपेढीवाले, लिलावात खरेदी करणारे यांवरही हल्ले केले. जमीनदार व शेतकऱ्यांनी एकत्र येऊन काहीवेळेस ब्रिटिश राजवटीविरुद्ध लढा दिला. या लढ्यात तथाकथित खालच्या जातीतील व परिघावरील लोकांचा मोठा सहभाग होता. बुंदेलखंड भागातील अपुऱ्या शेतकी उत्पादनामुळे शेतकरी, जमीनदार अशी सर्वांचीच परिस्थिती उपासमारीची होती; त्यामुळे आपांपसांतील भेद विसरून ब्रिटिश राजवटीविरुद्ध लोक लढले, अशी मांडणी तप्ती रॉय यांनी केली आहे.

रजत रे[२२] यांनी आपल्या पुस्तकात काही नवे प्रतिपादन केले आहे. वंश हा १८५७ च्या उठावातील एक महत्त्वपूर्ण घटक होता. हिंदू आणि मुस्लिम या दोन्ही वंशाच्या लोकांनी आपल्या समान मातृभूमीसाठी हा उठाव केला. हा उठाव एका परकीय गोऱ्या वंशाच्या सत्तेविरुद्ध होता. येथील उठावकर्त्यांनी एक नवीन पर्यायी राजकीय रचना निर्माण केली. त्यांनी निवडलेले संस्थानिक वा राजे यांनाच गादीवर बसवण्यात आले. म्हणून या रचनेचे स्वरूप पारंपरिक नव्हते तर लोकशाहीसदृश होते. या रचनेला लोकांच्या चळवळीचा पाठिंबा होता. मात्र रजत रे यांना धर्मयुद्ध (War of religion) मानायला तयार नाहीत. हा उठाव प्रभावी सत्तेच्या धर्माविरुद्ध नव्हता तर तिच्या राजकीय वर्चस्वाविरुद्ध होता. मात्र या लढ्याचे स्वरूप आधुनिक स्वातंत्र्य चळवळीसारखेही नव्हते. आपला धर्म आणि दीन यांच्या रक्षणासाठी आणि देशासाठी हिंदू-मुस्लिमांनी बंधुतेचा प्रत्यय देत हा उठाव केला. रजत रे यांचा हा निष्कर्ष अधिक समतोल व म्हणून स्वागतार्ह वाटतो.

गौतम भद्रा[२३] यांनी छोटा नागपूर भागातील गोनू या कोळ आदिवासींच्या नेत्याच्या उठावातील सहभागावर प्रकाश टाकला आहे. के. एस. सिंग[२४] यांनी छोटा नागपूर भाग, मध्य व पश्चिम भारत या भागातील आदिवासी उठावांच्या स्वरूपाचे विश्लेषण केले आहे. या उठावांमध्ये आदिवासी आणि इतर समूहांतील एकजूट तसेच एतद्देशीय शोषक-गट-सावकार, व्यापारी यांविरुद्ध उघडलेली संयुक्त आघाडी यांचा परामर्श त्यांनी आपल्या लेखात घेतला आहे.

'इकॉनॉमिक अॅण्ड पॉलिटिकल विकली' या नियतकालिकाचा १२-१८ मे २००७ चा अंक हा १८५७ च्या उठावावरील विशेषांक आहे. या अंकामधील वर्दी नारायण तिवारी व चारू गुप्ता यांचे लेख १८५७ च्या उठावातील दलितांच्या सहभागावर प्रकाश टाकतात.[२५]

चारू गुप्ता यांच्या मते, मुख्यप्रवाही पारंपरिक इतिहासलेखनामध्ये उदा. पाठ्यपुस्तके, पुनर्रचित महाविद्यालयीन अभ्यासक्रम व अभ्यासपूर्ण ग्रंथांमध्ये दलितांच्या या उठावातील योगदानाचा उल्लेखही होत नाही. दलित साहित्य, लोकगीते, पोवाडे, नाटके, चरित्रे, मौखिक कथने, मिथके अशा विविध माध्यमांतून दलितांच्या या उठावातील सहभागाच्या स्मृती जिवंत ठेवल्या गेल्या आहेत.

चारू गुप्ता यांनी आपल्या लेखात दलित साहित्यातून चित्रित होणाऱ्या वीरांगना - झलकारीबाई, उदादेवी, आशादेवी, गुर्जरी, वाल्मिकी महविरोदेवी, रहिमा गुर्जरी, भगवनीदेवी, भगवतीदेवी, हबिबा गुर्जरी, इंद्राकौर, कुशलदेवी, अवंतीबाई या व अशा अनेक जणींच्या साहसकथा अभ्यासल्या आहेत. या कथा दलित समाजाच्या एकजुटीचे प्रतीक व प्रेरणास्थान म्हणून मौखिक व लिखित अशा दोन्ही परंपरेने कशा पुनरुत्पादित केल्या, याची मांडणी लेखिकेने केली आहे.

मात्र यांतील बहुतांश वीरांगनांची चरित्रे दलित पुरुष निर्मित आहेत आणि 'शौर्याच्या मेरूमणी, सुंदर, पतिव्रता' अशा पितृसत्ताक साचेबंद मूल्यांच्या चौकटीतच बद्ध केलेल्या आहेत. तेव्हा गायत्री स्पिवॅक यांच्या 'कॅन



अनुक्रमणिका

द सबाल्र्टन स्पीक?' या प्रश्नाला या कथनांनी उत्तर दिले असले तरी जोपर्यंत दलित स्त्रिया स्वतःच्या अस्मिता स्वतः घडविणार नाहीत, स्वतःचा इतिहास लिहिणार नाहीत, तोपर्यंत त्या खऱ्या अर्थाने दलित स्त्रियांच्या मुक्तिगाथा होणार नाहीत, असा निष्कर्ष चारू गुप्ता यांनी काढला आहे.

बद्री नारायण तिवारी यांनी उत्तरप्रदेश, बिहार व इतर भागातील दलित समाजाने १८५७ च्या उठावातील स्मृतींशी आपल्या दैनंदिन जगण्याची नाळ कशी जोडून घेतली आहे, हे दर्शविले आहे. दलितांची लोकगीते, मिथके यांमधून दलित समूहमनाच्या प्रेरणांचा आविष्कार झालेला आहे. शिपायांचे बंड म्हणून जे हिणवले गेले, ते बंड सैनिकांनी सुरू केले आणि त्यातील बहुतांश सैनिक हे दलितच होते, म्हणून उठावाची सुरुवात दलितां-नीच केली; दलितांसाठीच हे स्वातंत्र्ययुद्ध होते कारण कोणतेही हितसंबंध वा सत्ता यांसाठी ते झगडत नव्हते, अशी मांडणी या लेखात केलेली आहे.

मंगल पांडेच्या बंडाने १८५७ च्या उठावाची सुरुवात झाली, असा समज आहे. याचा प्रतिवाद करणारे नवे तथ्य दलित कथनांमधून पुढे आले आहे. या तथ्याचा उल्लेख सावरकरांच्या पुस्तकामध्येही आहे. मंगल पांडे या ब्राह्मण सैनिकाने एका अस्पृश्य सैनिकाला–मातदीन भंग्याला पाणी देण्यास नकार दिला. तेव्हा त्या अस्पृश्याने या ब्राह्मणाची कानउघाडणी केली. काडतुसांवरील (गाय वा डुकराची) चरबीचे आवरण तोडताना तुमची जात व धर्म भ्रष्ट होत नाही काय, असा सवाल त्याने केला. मातदीन भंग्याने केलेल्या या प्रश्नाने मंगल पांडे व इतर सैनिकांच्या मनात उठावाचा वणवा पेटला. यावर एका इतिहासकाराने '१८५७ की क्रांती का जनक : नागवंशी भंगी मातदीन हेला', असे पुस्तकच लिहिले आहे. अशा-प्रकारे इतिहासातील तथ्ये, चरित्रे, घटना दलितांना दैनंदिन जीवनातील सामाजिक, आर्थिक व राजकीय नकार व भेदाभेद यांना तोंड देताना प्रेरणा देतात.

लता सिंग यांच्या लेखात[२६] त्यांनी पेशाने व जातीने नर्तिका असलेल्या स्त्रियांचा १८५७ च्या उठावात कसा सहभाग होता, याची चर्चा केली आहे. भारतीय स्त्रियांचे हुंकार इतिहासाच्या क्षितिजावर उमटू लागले आहेत, मात्र स्त्रीवादी बुद्धिमंत मध्यमवर्गीय स्त्रीच्या पलीकडील 'इतर' स्त्रियांविषयी लिहीत नाहीत, अशी टीका लता सिंग यांनी केली आहे.

या उठावात अझीझुन निसा या नर्तकीने व इतर नर्तकींनी सक्रिय सहभाग घेतला. मात्र मुख्य प्रवाही इतिहासलेखनामध्ये त्याची नोंद घेतली गेलेली नाही. सावरकरांच्या पुस्तकामध्ये या नर्तकीचा एक त्रोटक उल्लेख आहे. त्रिपुरारी शर्मा या एन. एस. डी. येथील प्राध्यापिका व दिग्दर्शक यांनी लिहिलेल्या कादंबरीवर हा लेख आधारलेला आहे. साहित्याच्या माध्यमातून इतिहास मांडण्याचा हा प्रयत्न निश्चितच स्तुत्य आहे.

ब्रिटिशपूर्व काळात जात व पेशाने नर्तिका असलेल्या स्त्रियांचा हिंदू व मुस्लिम दरबारात सांस्कृतिक व राजकीय प्रभाव मोठा होता. या तवायफ होत्या; वेश्या नव्हत्या. उर्दू भाषा, साहित्य, नृत्य (कथक) व शास्त्रीय संगीत यांच्या या उत्तम जाणकार असत. काही तवायफ तर शहरातील सर्वाधिक कर भरणाऱ्या समाजातील श्रीमंत वर्गांपैकी होत्या. ब्रिटिश काळात या तवायफांचा राजाश्रय संपला कारण संस्थाने खालसा झाली. ब्रिटिश अधि-काऱ्यांनी या बुद्धिमान, प्रतिष्ठीत कलाकारांची गणना वेश्यांमध्ये केली. त्यांच्या कोठ्यांना 'वेश्यागृह' ठरवले. त्यांना १८६४ च्या ब्रिटिश संसर्गजन्य कायद्यामुळे नियमित वैद्यकीय तपासणीला सामोरे जावे लागे. ब्रिटिश सैनिकांना काही निवडक सुंदर नर्तिका पुरविल्या जात. या स्त्रियांचे शरीर, अस्मिता, दर्जा आणि संस्कृती यांवरील हा मोठा आघात होता. आणि म्हणून नवाबांचे अनुकरण म्हणून नव्हे तर आपल्या अस्मितेसाठी या नर्तिका १८५७ च्या उठावात सामील झाल्या. लता सिंग यांच्या मते, शर्मा यांच्या या नाटकाने अभिजन, मध्यमवर्गीय वसाहतवाद-विरोधी राष्ट्रीय परिभाषेतातील (discourse) 'मदर इंडिया' (भारत माता) या आदर्शाला आव्हान दिले आहे. या नाटकाद्वारे या वर्गातील स्त्रियांना राष्ट्रवादी परिप्रेक्ष्यामध्ये नाकारला गेलेला अवकाश देण्याचा प्रयत्न केला आहे.

संगीत वा इतर कला क्षेत्रात या उठावाचे काय पडसाद उमटले, यावरही संशोधन झालेले आहे.[२७] प्रमोद मुनघाटे यांनी मराठी कादंबऱ्यांमधून हा उठाव कसा चित्रित केला गेला, याचे विश्लेषण आपल्या पुस्तकात

केले आहे.[२८] ऐश्वर्या लक्ष्मी यांनी या उठावावर आधारलेल्या कादंबऱ्यांचा परामर्श घेतला आहे.[२९]

१८५७ च्या उठावावरील अलीकडच्या काळातील दोन नवीन पुस्तके खूप विवादास्पद ठरली. त्यांपैकी पहिले म्हणजे विल्यम डॅलरिम्पल यांचे 'द लास्ट मुघल द फॉल ऑफ अ डायनेस्टी' (The Last Mughal The Fall of a Dynasty) हे पुस्तक होय.[३०] हा उठाव म्हणजे एक धर्मयुद्ध होते (War of religion), असा निष्कर्ष त्यांनी या पुस्तकात मांडला आहे. दिल्लीच्या राष्ट्रीय संग्रहालयातील वीस हजारांहून अधिक फारशी व उर्दू कागदपत्रांचा अभ्यास करून त्यांनी आपले प्रमेय मांडले आहे. बंडखोरांनी प्रसिद्ध केलेल्या निवेदनामध्ये 'दिन' व 'धर्म' या शब्दांचा वापर सातत्याने आला आहे; आणि म्हणून हे धर्मयुद्ध होते, असा त्यांचा पवित्रा आहे.

मात्र 'जिहाद' या शब्दाचा अर्थ खूप वेळा चुकीच्या पद्धतीने लावला जातो. जिहाद म्हणजे साम्राज्यवादविरोधी न्याय्य युद्ध. आधुनिकपूर्व काळात धर्म ही एकच अस्मिता समाजाकडे होती. धर्म व राजसत्ता यांची फारकत झालेली नव्हती. हिंदूंनी मुस्लिम राजवटीविरुद्ध कधीही धर्मयुद्ध पुकारले नाही, ही वस्तुस्थिती लक्षात घेतली पाहिजे. हिंदू-मुस्लिमांनी एकत्र येऊन ज्यावेळेस ब्रिटिशांविरुद्ध उठाव केला, तेव्हा तो एका परकीय राजवटीविरुद्ध होता; परकीय धर्माविरुद्ध नव्हता, हेही लक्षात ठेवले पाहिजे.

२००७ साली शेषराव मोरे यांचे '१८५७ चा जिहाद' हे पुस्तक प्रकाशित झाले.[३१] १८५७ चा उठाव हे मुस्लिमांचे धर्मयुद्ध होते, हे प्रमेय या पुस्तकात लेखकाने मांडले आहे. मोरे यांचे हे प्रमेय खूपच विवादास्पद ठरले. त्यांचे प्रतिपादन अतिशय पूर्वग्रह दूषित व बिनबुडाचे आहे. या प्रमेयाने अनेक प्रश्नचिन्हे उभी राहतात. उदा.
(१) या उठावातील बहुसंख्य शेतकरी, दलित, आदिवासी, जनसामान्य व अनेक नेते – तात्या टोपे, राणी लक्ष्मीबाई, कुंवरसिंह व इतर हे हिंदू होते; त्यांच्या सहभागाचा मग काय अन्वयार्थ लावायचा?
(२) आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या आणि आपल्या प्रमेयाला पूरक असणाऱ्या संशोधनाचे उतारेच्या उतारे मोरे यांनी या पुस्तकात दिले आहेत. मात्र त्यांच्या प्रमेयाला धक्का लावणाऱ्या राष्ट्रवादी वा मार्क्सवादी इतिहासलेखनाचा प्रतिवाद करण्याचा प्रयत्नही त्यांनी केलेला नाही. सारांश, संशोधनपद्धतीला पूर्णपणे धाब्यावर बसविल्यामुळे, या पुस्तकाची विश्वसनीयता खूपच कमी झाली आहे.

माधव दातार यांच्या '१८५७ चा उठाव : काल आणि आज' या पुस्तकामध्ये[३२] भारतीय समाजापुढे जे समकालीन ज्वलंत प्रश्न आहेत, त्यांच्या निराकरणासाठी १८५७ चा उठाव या ऐतिहासिक घटनेच्या अभ्यासातून भारतीयांना कोणती शिकवण घेता येईल, याची अतिशय मूलगामी चर्चा लेखकाने केली आहे. अनेक जाती, धर्म व पंथ असलेल्या भारतीय समाजामध्ये सर्व जाती-जमाती, पंथ व धर्मांच्या लोकांना एकत्र बांधणारा भारतीय राष्ट्रवाद याची आज भारतीय समाजाला गरज आहे. १८५७ च्या उठावाची ही शिकवण आपण लक्षात ठेवली पाहिजे, हा लेखकाचा विचार निश्चितच चिंतनीय आहे. १९८० नंतर बाबरी मस्जिद व राम जन्मभूमीच्या प्रश्नावरून चिघळलेले जमातवादी राजकारण, त्यानंतर झालेले बॉम्बहल्ले, भारतापुढील दहशतवाद व नक्षलवादाची आव्हाने ही परिस्थिती लक्षात घेता, १८५७ च्या उठावात झालेला धर्म व हिंसेचा वापर याचे आज उदात्तीकरण करणे घातक आहे, हा लेखकाचा विचार निश्चितच पथदर्शक आहे. १८५७ च्या उठावातील अपयशानंतर भारतीय समाजाने येथील समाज व अर्थव्यवस्थेत बदल घडवून आणले. हे बदल म्हणजे भारतीयांच्या आधुनिकीकरणाचा, राष्ट्रनिर्मितीचा प्रयत्न होता. आज जागतिकीकरणाशी सामना देतानाही आपल्या व्यवस्थेत काही अंतर्गत बदल आवश्यक आहेत, याचेही सूतोवाच लेखकाने आपल्या पुस्तकात केले आहे; मात्र हे बदल नेमके कशा प्रकारचे असायला हवेत, याची अधिक स्पष्ट व विस्तृत चर्चा करायला हवी होती.

इतिहासलेखनामध्ये अंतिम सत्य असे काही नसते. इतिहास ही भूतकाळाची वर्तमानाच्या संदर्भात केलेली पुनर्मांडणी असते. १८५७ च्या उठावासंदर्भात अनेक देशी भाषांमधील ऐतिहासिक दस्तऐवज आजही इतिहासकारांच्या प्रतीक्षेत वाट बघत आहेत. पंजाब, अवध, बुंदेलखंड वगळता भारताच्या इतर भागातील १८५७

च्या उठावातील प्रादेशिक अभ्यास व्हायला हवेत. दक्षिण भारतातही या उठावाचे लोण पसरले होते, असे सिद्ध करणारे संशोधन पुढे आले आहे. महाराष्ट्रात कोळी, भिल्ल, रामोशी यांचाही उठावामध्ये सक्रिय सहभाग होता. मात्र याही विषयावर सखोल संशोधनाची गरज आहे.

**संदर्भ आणि टीपा :**

१. अधिक माहितीसाठी पहा –
   (१) Charles Ball, The History of the Indian Mutiny : Giving a Detailed account of the Sepoy Insurrection in India; and a Concise History of the Great Military Events which have tended to consolidate British Empire in Hindostan, 2 Volumes, The London Printing and Publishing Co., London, 1858-59.
   (२) Willian Kaye, History of the Sepoy War in India 1857-58, 3 Volumes, H.Allen and Co., London, 1864-76.
   (३) Malleson, History of the Indian Mutiny, 1880.

२. Benjamin Disraeli cited in 'Introduction The Nature of 1857', in Biswamoy Pati (Ed.), The 1857 Rebellion, Oxford University Press, New Delhi, 2007, p. xiv. (Hence forth Pati .... 'Rebellion')

३. Ibid, p. xv.

४. फ्रेडरिक ऐंगल्स – डॉ. अरूण जोशी, प्रा. राजा दीक्षित, नीलिमा ठाकूरदेसाई, ब्रिटिश साम्राज्यवाद आणि भारत, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक, १९९१, पृ. ३७ वर उद्धृत.

५. महात्मा फुले – डॉ. प्रमोद मुनघाटे, अठराशे सत्तावन सत्य आणि कल्पित, विजय प्रकाशन, नागपूर, १९९४, पृ. ९ वर उद्धृत.

६. Syed Ahmad Khan, The Causes of the Indian Revolt (Asbad - e - Baghawat - e - Hind), OUP, Karachi, 2000.

७. प्र. के. अत्रे, 'भारतीय क्रांतीचा महान वेद', समाविष्ट, विश्वनाथ वि. पटवर्धन, सत्तावनचे स्वातंत्र्यसमर, पुणे, १९५४, पृ. ५–१२. (वि. दा. सावरकरांच्या The Indian War of Independence ची संक्षिप्त मराठी आवृत्ती)

८. वि. दा. सावरकर, समग्र सावरकर वाङ्मय खंड ४, स्वातंत्र्यवीर राष्ट्रीय स्मारक प्रकाशन, मुंबई, २०००-२००१, पृ. १८२–१८३.

९. Jyotirmaya Sharma, 'History as Revenge and Retalliation : Rereading Savarkar's The War of Independence of 1857,' Economic and Political Weekly, Vol. XLII, No. 19, Issue May 12-18, 2007, Pp 1717-1719.

१०. Pati ..... 'Rebellion, op. cit., p. xvi.

११. पहा –
   (१) S. B. Chaudhari, Civil Rebellion in the Indian Mutinies 1858-59, World Press, Calcutta, 1957.
   (२) S. N. Sen, Eighteen Fifty-Seven, Publication Division, Govt. of India, New Delhi, 1957.
   (३) R. C. Majumdar, The Sepoy Mutiny and the Revolt of 1857, Firma K. L. Mukhopadhyay, Calcutta, 1963.
   (४) K. K. Datta, Reflections on the Mutiny, Calcutta University Press, Calcutta, 1967.

१२. P. C. Joshi (Ed.), Rebellion 1857, National Book Trust, New Delhi, 2007 (First published as '1857 : A Symposium, People's Publishing House, New Delhi, 1957 under the editorship of P. C. Joshi).

१३. Talmiz Khaldun, 'The Great Rebellion,'

op. cit, P. P. 3-77.
१४. P. C. Joshi, '1857 in our History,' op. cit., p. p. 129-239.
१५. P. C. Gupta, '1857 and Hindi Literature,' op. cit; p. p. 243-255.
१६. S. Ehtesham Husain, 'Urdu Literature and the Revolt', op. cit; p. p. 256-264.
१७. K. M. Ashraf, 'Ghalib and the Revolt of 1857', op. cit; p. p. 265-77.
१८. P. C. Joshi, 'Folk songs on 1857', op. cit., p. p. 292-309.
१९. पहा –
(१) Eric Stokes, The Peasant and the Raj : Studies in Peasant Society and Agrarian Rebellion in Colonial India, Vikas, New Delhi, 1978.
(२) Eric Stokes, The Peasant Armed : The India Revolt of 1857, Clarendon Press, London, 1978.
२०. Rudrangshu Mukherjee, Awadh in Revolt, 1857-58 : A Study of Popular Resistance, Oxford University Press, Delhi, 1984.
२१. Tapti Roy, The Politics of a Popular Uprising : Bundelkhand in 1857, Oxford University Press, Delhi, 1994.
२२. Rajat Kanta Ray, The Felt Community : Commonality and Mentality before the Emergence of Indian Nationalism, Oxford University Press, Delhi, 2003.
२३. Gautam Bhadra, 'Four Rebels of Eighteen Fifty-seven', in Pati, '...Rebellion', op. cit., p. p. 257-261.
२४. K. S. Singh, 'The Tribals and the 1857 Uprising', op. cit; p. p. 262-271.
२५. पहा –
(१) Badri Narayan Tiwari, 'Reactivating the Past : Dalits and Memories of 1857, EPW, op. cit; p. p. 1734-1738.
(2) Charu Gupta, 'Dalit Viranganas and Reinvention of 1857', op. cit, p. p. 1739-1745.
२६. Lata Singh, 'Visibilising the 'other' in History Courtesans and the Revolt', op. cit., p. p. 1677-1680.
२७. John Barlouw, Laxmi Subramaniam, 'Music and Society in North India : From the Mughals to the Mutiny', op. cit., p. p. 1779-1787.
२८. डॉ. प्रमोद मुनघाटे, पूर्वोक्त, पृ. ११५-१७६.
२९. Indrani Sen, 'Inscribing the Rani of Jhansi in Colonial 'Mutiny' 'Fiction', EPW, op. cit., p. p. 1754-1761.
३०. William Dalrymple, The Last Mughal : The Fall of a Dynasty, Viking, New Delhi, 2006.
३१. शेषराव मोरे, १८५७ चा जिहाद, अभिनव निर्माण प्रतिष्ठान, पुणे, २००७.
३२. माधव दातार, १८५७ चा उठाव : काल आणि आज, कन्सेप्ट मिडिया सर्व्हिसेस प्रा. लि., पुणे, २००८.

☆☆☆



# अठराव्या शतकाच्या भारतीय इतिहासाचे नवे आकलन

- प्रा. डॉ. सुमित्रा कुलकर्णी

१८ वे शतक हे पाश्चिमात्त्य जगतामध्ये अनेक अर्थानी महत्त्वपूर्ण होते. इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांतीचे प्रारंभीचे पर्व या काळात सुरू झाले होते. फ्रान्समध्ये जुन्या प्रस्थापित व्यवस्थेविरुद्धच्या संघर्षाचा हा काळ होता. विज्ञान आणि तंत्रज्ञानामध्ये झालेली प्रगती, व्यापार वृद्धी, युरोपीय राष्ट्रांनी सागरी सीमा ओलांडून विविध देशांमध्ये व्यापारासाठी केलेला प्रवेश या सारखी आणखीही काही वैशिष्ट्ये नमूद करता येतील. आशिया खंडामध्ये मात्र १८ व्या शतकात सफविद, तुर्की, मुघल व मांचू यांची साम्राज्ये लयास गेली. दक्षिण आशियामध्ये व भारतामध्ये १८ वे शतक हे स्थित्यंतराचे शतक होते. भारतामध्ये दोन अर्थसूचक स्थित्यंतरे या शतकात झाली. पहिले स्थित्यंतर म्हणजे मुघल साम्राज्याचे विघटन होऊन मुघलांच्या एककेंद्री अर्थकारणाचे प्रादेशिक राजकीय व्यवस्थेकडे झालेले संक्रमण होय. औरंगजेब बादशाहाच्या मृत्युनंतर मुघल साम्राज्याचे पतन होऊन रिक्त झालेले राजकीय अवकाश भरून काढण्यासाठी नव्याने निर्माण झालेली राजकीय व्यवस्था म्हणजेच प्रादेशिक स्वायत्त सत्तांचा उदय होय ज्यांना 'वारस राज्ये' असे संबोधले जाते. दुसरे महत्त्वाचे स्थित्यंतर म्हणजे १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात बंगालमध्ये ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीचा एक राजकीय सत्ता म्हणून झालेला उदय व त्यामुळे राज्यव्यवस्था, समाज व अर्थकारण यामध्ये झालेले बदल होत. या दोन महत्त्वाच्या स्थित्यंतरांमुळे भारतातील सत्तेची संरचना तर बदललीच परंतु त्याचबरोबर सामाजिक व आर्थिक पुनर्मांडणीला आरंभ झाला. या दोन स्थित्यंतरांचे विश्लेषण इतिहासकारांनी बारकाईने केले. या स्थित्यंतरांमुळे भारतामधील सामाजिक, आर्थिक क्षेत्रात जे बदल झाले ते बहुविध व विविध पातळ्यांवरील होते. त्या बदलांचे स्वरूप, त्यांचा वेग याकडे इतिहासकारांनी, संशोधकांनी वेगवेगळ्या परिप्रेक्षातून पाहण्याचा प्रयत्न केला. अलिकडे गेल्या दोन, तीन दशकात १८ व्या शतकाचे पुनरअवलोकन इतिहासकार, अर्थशास्त्रज्ञ, मानवशास्त्रज्ञ यांनी केल्यामुळे त्यास आंतरविद्याशाखीय स्वरूप प्राप्त होऊन त्यास व्यापकरूप प्राप्त झाले आहे. १८ व्या शतकासंबंधी जी नूतन मांडणी केलेली आहे त्याचा वेध घेण्याचा प्रयत्न मी प्रस्तुत लेखात केलेला आहे. या नव्या मांडणीची अनेक अंगे आहेत. त्यास विविध बाजू आहेत. त्या सर्व बाजूंचा, सर्व अंगांचा एका लेखात वेध घेणे अवघड आहे. या नूतन मांडणीमधील प्रत्येक इतिहासकाराची सैद्धांतिक मांडणी व त्यांच्या विवेचनातील सर्व मुद्द्यांची चर्चा करणे शक्य नाही. परंतु प्रातिनिधिक तसेच महत्त्वाच्या विश्लेषणांचा मागोवा घेण्याचा प्रयत्न येथे केलेला आहे.

अलिकडील, नूतन मांडणी असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा पूर्वीची, इतिहासकारांनी, संशोधकांनी १८ व्या शतकाची जी मीमांसा केली होती तिचा विचार प्रथम करणे आवश्यक आहे. कारण त्याशिवाय १८ व्या शतकासंबंधीचा जो वादंग आहे त्याची एक बाजू आपणास कळणार नाही.

१८ व्या शतकाची विभागणी पूर्वी दोन सरळ विभागात केली जात होती. पहिला विभाग म्हणजे ब्रिटिश सत्ता स्थापनेपूर्वीचा काळ व दुसरा विभाग म्हणजे ब्रिटिश सत्ता स्थापनेनंतरचा काळ. ब्रिटिशांची राजकीय सत्ता स्थापना याला मध्यवर्ती स्थान अर्थातच या विभागणीमध्ये होते. हे विभाजन प्रामुख्याने ब्रिटिश साम्राज्यवादी इतिहासकारांनी केलेले होते. जेम्स मील याने History of British India (1817) या पुस्तकात औरंगजेबाच्या मृत्युनंतर भारतातील मागासलेल्या व अराजकाकडे ओढल्या गेलेल्या समाजाचे वर्णन केलेले होते. त्यानंतर उपयुक्ततावादी आणि ईव्हॅन्जेलिकल्स या विचार प्रवाहातील लेखकांनी ही भारतामध्ये सुव्यवस्था व येथील समाजाची प्रगती व कल्याण साधण्याच्या नैतिक हेतूनेच वासाहतिक ब्रिटिश राज्य स्थापन केले होते अशी मांडणी केली. भारतामध्ये

प्रगतसंस्था आणि अर्थकारण असूनसुद्धा या साम्राज्यवादी मांडणीमधील मुख्य गृहितक असे होते की भारताचे सहजरित्या विनासायास वसाहतीमध्ये रूपांतर झाले. आणि फारसे काही प्रयत्न न करता जागतिक भांडवलशाही अर्थव्यवस्थेमध्ये तिचा समावेश झाला. थोडक्यात ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीच्या सत्तास्थापनेचे केवळ त्यांनी समर्थन केले नाही तर त्याला नैतिक अधिष्ठान देण्याचा प्रयत्न केला. एवढेच नव्हे तर दुसरे महत्त्वाचे म्हणजे १८ वे शतक हा वाढत्या अराजकाचा काळ होता व स्वतःच्या व्यापाराच्या रक्षणाकरता, वृद्धींकरता ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीचा एक राजकीय सत्ता म्हणून उदय झाला. तसेच १८ वे शतक हा एक 'काळा कालखंड' होता अशा स्वरूपाची मांडणी केली. हा विचार पुढे १९२९ मधील 'Cam-bridge History of India' मध्ये आढळतो.

राष्ट्रवादी इतिहासकारांच्या लिखाणामध्ये १८ वे शतक हा वाढत्या अराजकाचा काळ होता याचा प्रतिवाद केलेला आढळत नाही. परंतु राष्ट्रवादी इतिहासकारांना ब्रिटिश सत्ता स्थापना ही एक शोकपर्यावसायी प्रक्रिया वाटत होती.

त्यानंतर इतिहासकारांनी १८ व्या शतकातील ज्या दोन महत्त्वाच्या लढाया आहेत, १७६१ चे तिसरे पानिपत युद्ध व १७५७ ची प्लासीची लढाई, यानुसार १८ व्या शतकाचे दोन भाग कल्पून त्याचे विवेचन केले. १८ व्या शतकाच्या या विभाजनावर मराठा, मुघल आणि ब्रिटिश सत्तेच्या अभ्यासकांचे सर्वसाधारण एकमत होते. मुघल सत्तेच्या अभ्यासकांनी १७०७ मधील औरंगजेबाच्या मृत्यू-पासून मुघलसत्तेच्या पतनाची सुरुवात होऊन नादिरशाहाच्या १७३९ मधील दिल्ली स्वारीने ती प्रक्रिया त्वरेने घडली अशी मांडणी केली. मराठ्यांच्या अभ्यासकांनी १८ वे शतक हे मराठ्यांचे शतक होते; या शतकात मराठ्यांच्या सत्तेला अखिल भारतीय सत्तेचे स्वरूप प्राप्त झाले, स्वराज्याचे रूपांतर साम्राज्यात झाले ही मांडणी केली. ब्रिटिश सत्तेच्या अभ्यासकांना १७५७ मधील क्लाईव्हचा विजय हा महत्त्वाचा वाटत होता कारण त्यामुळेच ब्रिटिश साम्राज्याची मुहूर्तमेढ भारतामध्ये रोवली गेली होती.

मुघल साम्राज्याचे पतन हे १८ व्या शतकाच्या प्रथमार्धातील महत्त्वाचे स्थित्यंतर होते त्यामुळे इतिहास-कारांच्या अनेक पिढ्यांनी त्याचे अवलोकन केले व त्यामधून पतनाच्या मीमांसेला प्रारंभ झाला. आरंभीच्या इतिहास लेखनामध्ये राज्यकर्त्यांची वैयक्तिक, धार्मिक व प्रशासकीय धोरणे यावर प्रकाश टाकण्यात आला. राष्ट्रीय इतिहासकार, ब्रिटिश प्रशासकीय विद्वान यांनी राज्यकर्तावर्ग, त्यांची कृती यावर भर दिलेला दिसतो. त्यामुळे जदुनाथ सरकार औरंगजेबाला मध्यवर्ती स्थान देतात.[१] मुघल साम्राज्यात शेतकऱ्यांचे जे उठाव झाले त्याकडे ते औरंगजेबाच्या धार्मिक धोरणाची हिंदू प्रतिक्रिया म्हणून पाहतात. २० व्या शतकाच्या पाचव्या दशकाच्या शेवटी मार्क्सवादी इतिहासकारांनी मुघलसाम्राज्याच्या पत-नाची मीमांसा भौतिकवादी दृष्टिकोणातून करण्यास प्रारंभ केला. यानंतर आर्थिक इतिहासकारांनी मुघल साम्राज्याच्या पतनाची मीमांसा केली त्यामध्ये प्रामुख्याने प्रा. इरफान हबीब, प्रा. अथर अली यांचे उल्लेख महत्त्वाचे आहेत. प्रा. हबीब यांनी मुघलांचे पतन आणि परिणामी निर्माण झालेला राजकीय व आर्थिक असंतोष याचे विवेचन राजस्वाच्या आधारे केले. राज्यकर्त्यांनी जमीन महसुलाचा जो चढादर शेतकऱ्यांवर लादला त्यामुळे मोठ्या प्रमाणावर आर्थिक शोषण झाले. शेतकऱ्यांनी स्थलांतर केले व शेवटी उठावामध्ये त्याची प्रतिक्रिया उमटली ह्यामुळे शेती विषयक समस्या निर्माण होऊन त्याची परिणती मुघल साम्राज्याचा राजकीय डोलारा कोसळण्यात झाली असे विवेचन केले.[२] प्रा. अथर अली यांनी प्रामुख्याने 'जहागिरीची कमतरता' ह्या मुद्द्याभोवती विवेचन केले.[३] ही तूट कशामुळे निर्माण झाली तर दखखनसारख्या कमी सुपीक प्रदेशामध्ये मुघल सत्तेचा विस्तार झाला. ज्या प्रमाणात मनसबदारांची संख्या वाढली त्या प्रमाणात जहागिरीच्या जमिनीत वाढ झाली नाही. त्यामुळे प्रशासकीय समस्या निर्माण होऊन आर्थिक समस्या निर्माण झाल्या. साम्राज्याच्या प्रत्येक योजनेमध्ये जे रचनात्मक दोष निर्माण झाले त्याचा अपरिहार्य परिणाम मुघलांच्या राजकीय पतनामध्ये झाला. मुघल साम्राज्याच्या पतनाची मीमांसा करताना प्रादेशिक स्वायत्त सत्तांच्या उदयाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोण मुघल केंद्रित होता. दिल्ली केंद्रित होता. त्यांनी प्रादेशिक सत्तांच्या उदयाची मीमांसा मुघल सत्तेला आव्हान देण्यासाठी ग्रामीण शोषित समाजाने पुनर्मांडणी

अनुक्रमणिका

करण्याच्या शेवटच्या प्रयत्नाचा परिणाम म्हणून केली आहे.

१८ वे शतक हे आधुनिक भारताच्या इतिहासामधील काळा कालखंड होता असे मांडले गेले. 'Dark Age' हा शब्द प्रयोग कोणत्याही इतिहासकाराने आपल्या लिखाणामध्ये केलेला आढळत नाही. पण प्रा. इरफान हबीब यांनी या कालखंडाचे जे वर्णन केलेले आहे ते या शब्द प्रयोगाच्याजवळ जाते.[४]

थोडक्यात १८ व्या शतकाच्या पूर्वार्धाविषयी जी सैद्धांतिक मांडणी केली तिचा मतितार्थ असा होता की मुघल साम्राज्याचे पतन हे भारतातील राजकीय, सामाजिक आणि आर्थिक रचनेमधील जो जोम होता त्याची पिछेहाट होण्याचे ते चिन्ह होते. सुरुवात होती. राजकारण, समाजकारण, अर्थकारण या क्षेत्रातील सर्व घटकांमध्ये मुघल साम्राज्याच्या पतनानंतर पिछेहाट झाली. स्थितिशीलता आली. शहरीकरण, व्यापार मंदावला. या संदर्भात त्यांची मांडणी अशी होती की मुघलांचा व्यापार, शहरीकरण हे प्रामुख्याने ग्रामीण भागातून जुलूम जबरदस्तीने आकारलेल्या शेतसाऱ्यावरील अधिक्याच्या अभिसरणावर अवलंबून होते. जमिनदारांच्या उठावामुळे शेती विरोधी समस्या निर्माण झाल्या. महसूलाचा पुरवठा खेड्यातून थांबला अधिक्य घटले त्यामुळे अभिसरण थांबले व व्यापार मंदावला.

एक राजकीय सत्ता म्हणून ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीचा उदय या १८ व्या शतकातील दुसऱ्या स्थित्यंतराविषयी आधीच्या इतिहासकारांनी कोणती मांडणी केली ते थोडक्यात पाहू या. या संदर्भात काही प्रश्न उपस्थित केले गेले. ते म्हणजे वासाहतिक सत्ता स्थापनेमुळे भारतातील राजकारण, अर्थकारण, समाजकारण यामध्ये कोणते बदल झाले? त्या बदलांचे स्वरूप कसे होते? १७५७-१८०७ हा एक स्वतंत्र, वेगळा कालखंड आहे का? आधीच्या काळाशी त्याचे काही सातत्य होते का? ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीचा एक राजकीय सत्ता म्हणून झालेला उदय ही एक क्रांतिकारक घटना आहे का? की ज्यामधून पुढे अनेक परिवर्तनांना जन्म दिला गेला. ब्रिटिश सत्तेने आरंभीच्या अवस्थेमध्ये पारंपरिक संस्था आणि समकालीन भारतीय राज्यांची धोरणे राखली का? थोडक्यात आधीच्या काळाशी या काळाचे सातत्य सांगता येते का? किंवा काही मूलभूत बदल ब्रिटिश सत्तास्थापनेमुळे होऊन त्यामुळे हा काळ वेगळा वाटतो? प्रा. इरफान हबीब, अथर अली यासारख्या इतिहासकारांचे मत असे होते की आधीच्या कालखंडाशी या कालखंडाचे सातत्य नव्हते. तर ते छेद देणारे होते.

या मांडणीपेक्षा वेगळ्या स्वरूपाच्या मांडणीचा प्रारंभ हा विसाव्या शतकातील सातव्या दशकात सुरू झाला. एरिक स्टोकस् यांच्या 'The first century of British Colonial Rule' या निबंधामध्ये त्यांनी साम्राज्यवादी, राष्ट्रवादी इतिहासकारांपेक्षा वेगळी भूमिका घेतली. त्यांनी वासाहतिक, प्रशासकीय संस्था व वसाहतपूर्व प्रशासकीय संस्था यांच्या परस्परक्रियांवर प्रकाश टाकला. व त्यांच्यामध्ये 'सुसंगत संयोग' होता अशी मांडणी केली.

आधीच्या मांडणीला पूर्णपणे छेद देणारी मांडणी ही विसाव्या शतकाच्या आठव्या दशकात पुढे आली. सी. ए. बेली यांनी १८ वे शतक हा वाढत्या अराजकाचा कालखंड होता व त्यामुळेच ब्रिटिशांची भारतातील राजकीय सत्ता स्थापना ही कशी समर्थनीय होती हे खोडून काढले. १८ वे शतक हा काळा कालखंड होता याचा त्यांनी प्रतिवाद केला. १८ व्या शतकात राजकीय व आर्थिक जोम होता. मुघल साम्राज्याच्या पतनाबरोबरीने काही क्षेत्रात महत्त्वपूर्ण प्रगतीही झाली असे त्यांनी प्रतिपादन केले.[५] या त्यांच्या लिखाणामुळे १८ व्या शतकाच्या वादंगाला प्रारंभ झाला. यानंतर डेव्हीड वॉशब्रुक यांच्या नावाचा उल्लेख करणे आवश्यक होय. दक्षिण भारताच्या वसाहतपूर्व राजकीय अर्थकारणावर त्यांनी प्रकाश टाकला. फ्रँक पर्लिन यांनी महाराष्ट्रातील अभिलेखागारातील साधनांच्या मदतीने मराठ्यांच्या राज्य रचनेच्या प्रक्रियेमधील गुंतागुंतीची उकल करून व्यापारी उपक्रम हे त्याचे वैशिष्ट्य होते, असे सांगितले. पुढील काळात आंद्रेविंक, बर्टन स्टेन, मुजफ्फर आलम यासारख्या इतिहासकारांनी विविध प्रदेशांवर केलेल्या संशोधकीय लिखाणांमुळे १८ व्या शतकासंबंधीचा वादंग अधिक पुढे आला. १८ व्या शतकाविषयीच्या पारंपरिक सैद्धांतिक मांडणी विरुद्धच्या प्रतिक्रियेमधून नवीन नवीन दृष्टिकोण अभिव्यक्त झाले. १८ व्या शतकाच्या या नूतन मांडणीमध्ये इतिहासकार,

अर्थशास्त्रज्ञ, मानवशास्त्रज्ञ यांनी योगदान दिले. त्यांच्या लिखाणाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी १८ व्या शतकाच्या पूर्वार्धाचा अभ्यास मुघलसत्तेला मध्यवर्ती न ठेवता स्वत:च्या परिमाणात अभ्यासण्याचा प्रयत्न केला. १८ व्या शतकाच्या नूतन मांडणीमध्ये प्रादेशिक इतिहासावरील झालेल्या संशोधनाने महत्त्वपूर्ण भूमिका पार पाडली. प्रादेशिक इतिहास आपण का अभ्यासतो? तर राष्ट्रीय इतिहास समृद्ध करण्यासाठीच होय. विविध प्रादेशिक इतिहासावरील नव्याने झालेल्या संशोधनामुळे १८ व्या शतकासंबंधी नवे परिप्रेक्ष्य, नवी सैद्धान्तिक मांडणी पुढे येऊन त्यामधून प्रादेशिक स्वायत्त राज्यांचे नवे स्वरूप मांडले गेले. या नूतन मांडणीचे आणखी एक महत्त्वाचे वैशिष्ट्य असे होते की, आतापर्यंत प्रामुख्याने युरोपीय भाषांमधील तसेच फारसी भाषेमधील साधने इतिहासलेखनासाठी उपयोगात आणली जात होती. परंतु आता वेगवेगळ्या प्रादेशिक भाषांमधील उपलब्ध असलेल्या विपुल साधनसामुग्रीचा उपयोग संशोधकांनी केला त्यामुळे प्रादेशिक इतिहासाच्या दृष्टिकोणातून म्हणजेच परिघ प्रदेशीय दृष्टिकोणातून केंद्र म्हणजे मुघल अर्थव्यवस्था आणि समाज यांची छाननी सुरू झाली. यातून १८ व्या शतकाच्या प्रथमार्धातील 'अराजक' 'आर्थिक स्थितिशीलता' 'काळा कालखंड' ही मांडणी मागे पडून 'आर्थिक सुबत्ता' ही मांडणी पुढे आली. मुघल साम्राज्याचे पतन जरी झाले तरी शेती व्यापार, हस्तव्यवसाय इ. क्षेत्रात पिछेहाट झाली नाही हे या संशोधकांनी प्रतिपादले.

१८ व्या शतकामध्ये मुघल साम्राज्याच्या पतनानंतर जी प्रादेशिक स्वायत्त राज्ये निर्माण झाली. त्या प्रादेशिक अर्थकारणाला आधार आणि आकार देणाऱ्या शेती व्यतिरिक्त आर्थिक घटकांच्या अभ्यासावर विविध संशोधक, इतिहासकारांनी भर दिला. व्यापाराचे बदलत जाणारे आकृतिबंध, युद्ध, लूट, व्यापारी भांडवलाचे केंद्रस्थानाकडून परिघ क्षेत्राकडे म्हणजे प्रांतिक राजकीय सत्तेकडे झालेले स्थलांतर यासारख्या विषयांवर लिहिणाऱ्यात अशिनदास गुप्ता, बी. आर. ग्रोव्हर, करन लिओबार्ड, स्टुअर्ट गॉर्डन, रिचर्ड बार्नेट या इतिहासकारांचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. स्टुअर्ट गॉर्डन व बर्टन स्टेन यांनी युद्ध आणि लूट व त्यांचा प्रादेशिक अर्थकारणाशी असलेला दुवा यावर भर दिला. यासंदर्भात बर्टन स्टेन यांनी 'Military Fiscalism' ही संज्ञा प्रामुख्याने मांडली. त्याचा थोडक्यात सारांश असा आहे की महसूल नियमित गोळा करण्याची तातडीची गरज १८ व्या शतकातील राज्यकर्त्यांपुढे होती कारण युद्धासाठी मोठ्या संख्येने त्यांना लष्कर ठेवावे लागे त्यामुळे युद्ध आणि लष्करी गतिशीलता ही १८ व्या शतकाच्या पूर्वार्धातील बदलांची मुख्य माध्यमे होती, मुख्य टेकू होते.

मराठ्यांच्या इतिहासाच्या संदर्भात आंद्रेविंक यांनी 'फितना' या मुघल राजपदाच्या प्रारूपाच्या संदर्भात मराठ्यांच्या सत्तेच्या स्वरूपाची मीमांसा केली.[६] स्टुअर्ट गॉर्डन यांनी मराठ्यांच्या इतिहासावर लिखाण केलेले आहे. त्यांनी माळवा प्रांतामधील मराठा राज्याच्या रचनेचे प्रारूपाविषयी विवेचन केले आहे.[७] सुमित गुहा यांनी १७४० नंतर मराठ्यांच्या प्रदेशातील व्यापार वृद्धी कशी झाली होती याचे विवेचन केले आहे.[८] मुजफ्फर आलम यांनी अवधसुक्यावर संशोधन केले आहे.[९] १८ व्या शतकातील प्रथमार्थ हा अवधमध्ये आर्थिक वाढीचा व समृद्धीचा होता. त्यामध्ये व्यापारीकरणामध्ये झालेली वाढ आणि अर्थकारणाचे चलनी नाण्यामध्ये झालेले रूपांतर व त्यामुळे आलेली आर्थिक संपन्नता त्यांनी अधोरेखित केली. हैद्राबाद राज्यावर लिओनार्ड यांनी संशोधनपर लिखाण केले. हैद्राबाद राज्याची व्यवस्थाही आश्रयदाता, मालक आणि कूळ यांच्या संबंधावर आधारित होती अशा स्वरूपाची मांडणी केली व निजाम हा मुख्य पोशिंदा होता असे प्रतिपादन केले.

बंगालवर ज्यांनी संशोधन करून लिखाण केले त्यामध्ये अब्दुल करीम, पी. जे. मार्शल, ओम प्रकाश, सुशील चौधरी यासारख्या इतिहासकारांचा अंतर्भाव होतो. ओम प्रकाश यांनी युरोपियन व्यापारी कंपनीचा अभ्यास करताना युरोपकडे कापड व रेशीम यांच्या निर्यातीमध्ये बंगालला मध्यवर्ती स्थान होते असे मांडले आहे. परिणामी चलनाचा फार मोठा ओघ बंगालकडे आला व बंगाल प्रांतातील ही समृद्धी इ. स. १७६० पर्यंत चालू होती, असे मत मांडले आहे. चेतनसिंग यांच्या पंजाबवरील संशोधनाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी तेथील राजकीय अर्थकारणामध्ये आतापर्यंत दुर्लक्षित जनजातींच्या कार्याचा

अंतर्भाव केला.[१०] पंजाबवरील संशोधनपर लिखाणामध्ये जे. एस. ग्रेवाल, इंदू बंगा यांचाही उल्लेख महत्त्वाचा आहे.

दक्षिण भारताच्या इतिहास लेखनात बर्टन स्टेन, लदेन शूलमन डिर्क, दिलीप मेनन यासारख्यां इतिहासकारांचे योगदान महत्त्वपूर्ण आहे.

वर उल्लेख केलेल्या अशा प्रकारच्या प्रादेशिक इतिहासावरील अभ्यासामुळे व संशोधनामुळे दिल्ली किंवा मुघल केंद्रीत आर्थिक संदर्भातील मांडणी मागे पडून प्रादेशिक सत्तांच्या भूमिकेकडे लक्ष वेधले गेले. मुघल साम्राज्याच्या पतनानंतर कायदा व सुव्यवस्था ढासळली, व्यापार मंदावला, आर्थिक स्थिती आली सर्व क्षेत्रामध्ये पिछेहाट झाली ही मांडणी मागे पडून 'आर्थिक सुबत्ता' ही मांडणी पुढे आली.

१८ व्या शतकात सर्व भारतामध्ये शेतीचे उत्पन्न वाढलेले दिसते. शेतीच्या लागवडीखालील क्षेत्रात वाढ झाली. अंतर्गत व बहिर्गत व्यापाराचे प्रमाण वाढले. आशिया व युरोप बरोबरील व्यापारामध्ये या काळात वाढ झाली. या आर्थिक विस्तारीकरणाचा फायदा जर कोणाला झाला असेल तर तो म्हणजे राज्यकर्ते व जनसामान्य यांच्यामधील गटांना झाला. त्यामध्ये जमिनदार, व्यापारी व सावकार हे गट होते. सी. ए. बेली यांनी उत्तर भारताच्या संदर्भात आणि रजत दत्त यांनी बंगालच्या संदर्भात या व्यापारी जमातींच्या भूमिकेविषयी मांडणी केली आहे. आणखी एका गटाला या नवीन राज्यव्यवस्थेमध्ये महत्त्व प्राप्त झाले. ते म्हणजे लष्करी किंवा मुलकीपद भूषविणारे व त्याचबरोबर जे धर्माचरण करून विद्येचे संवर्धन करतात व त्यासाठी त्यांना ईनामे दिली जातात. या सर्व मध्यस्त गटांना या वाढत्या संपत्तीचा फायदा होत होता.

अलिकडील लिखाणातील महत्त्वाची मांडणी अशी आहे की या सर्व गटांचा पाठिंबा, संमती घेण्यामध्ये मुघलांपेक्षा प्रादेशिक सत्ता अधिक अग्रभागी होत्या. त्यामुळेच स्थानिक पातळीवर त्यांना पाठिंबा मिळाला. नव्याने उदयास आलेल्या प्रादेशिक राज्यांच्या ज्या गरजा होत्या त्या पूर्ण करण्याच्या माध्यमातून जमिनदार, व्यापारी, सावकार या सर्वांना फायद्याच्या संधी मिळाल्या. त्यांना त्यांच्या सेवांच्या मोबदल्यात सरकारमधील फायद्याचा हिस्सा मिळाला. अवधराज्यावरील अलिकडील झालेल्या संशोधनामध्ये असे मांडले गेले आहे की ज्या जमिनदार वर्गाला मुघलांच्या विरोधाचा फार मोठा भूतकाळ आहे त्या जमिनदारांना राज्यकर्त्यांनी सत्तेशी बांधून घेतले व त्यांचा पाठिंबा मिळवला. अवधच्या राज्यामध्ये हिंदूंना मोठी पदे होती. बंगालच्या नबाबांची सत्ता जमिनदार, स्थानिक पातळीवरील प्रशासक, लष्करामध्ये वाकबगार असलेले हिंदू यांच्या पाठिंब्यावर अवलंबून होती. १८ व्या शतकाची मराठ्यांच्या राज्यामध्ये सावकारांनी महसूल व्यवस्था व सैन्याच्या खर्चासाठी पतपुरवठा करण्यामध्ये जी महत्त्वाची भूमिका पार पाडली ही सर्वज्ञात आहेच.

१८ व्या शतकामध्ये सर्व भारतभर श्रीमंत व्यापारी सावकारांच्या पेढ्या व जमिनदार हे नव्याने निर्माण झालेल्या व्यवस्थेचे आधारस्तंभ बनलेले दिसतात. सावकारांमुळे तात्काळ पैसा उपलब्ध होत असे. हुंडीच्या मार्फत हे सावकार एका ठिकाणापासून लांब ठिकाणी पैसे पाठवत असत. स्वतः राज्यकर्तेदेखील या सावकारांकडून लष्करी मोहिमा, लष्करावरील खर्च यासाठी कर्ज घेत असत. पेशव्यांचे उदाहरण आपणा सर्वांना माहित आहेच. जगतशेट मारवाडी घराणे, जे बंगालच्या नबाबाचे सावकार होते, ते बँक ऑफ इंग्लंडएवढे श्रीमंत होते. बंगालमधील व्यापाऱ्यांचे टांकसाळीवर नियंत्रण होते. दिल्लीच्या बादशाहाला ते खंडणी भरत. १८ व्या शतकातील राज्यकर्त्यांना लष्कर व त्याच्या गरजा भागविण्यासाठी रोख रोकड रकमेची गरज असे ही रक्कम हे व्यापारी उभी करत असत.

१८ व्या शतकातील प्रादेशिक स्वायत्त राज्यांची सत्ता त्यांच्या प्रदेशातील सर्वच भागांवर नसे. जंगल तसेच पर्वतराजींमध्ये आदिवासी राहात असत. ह्या आदिवासी जमातींची स्वतःची राजकीय पद्धत होती. मुघलांचा काय किंवा प्रादेशिक राज्यांचा प्रत्यक्ष अंमल त्यांच्यावर नसे. फारतर वर्षाकाठी काही खंडणी ते देत असावेत. डोंगराळ भागात व जंगलात राहाणाऱ्यांचे व एतद्देशीय सत्तांच्या संबंधाचे स्वरूप कसे होते यावर अजय कारिया यांनी प्रकाश टाकला आहे. आपल्या लिखाणामध्ये त्यांनी आदिवासी जमाती ह्या समाजाच्या वर्तुळाबाहेरील नव्हत्या

ही भूमिका मांडली. सपाट प्रदेशावर राहाणाऱ्या लोकांशी त्यांची देवाणघेवाण चालत असे असे म्हटले आहे.[११] पेशव्यांनी भिल्ल, गोंड यांची स्वायत्तता मर्यादित न करता त्यांनी दंगे, बंड करू नये, एका जागी राहून शेती करावी यासाठी उत्तेजन दिलेले आहे.

१८ व्या शतकातील अर्थकारणाचा विचार करताना चलनाच्या व रोख पैशाच्या वापराचे प्रमाण वाढलेले दिसते. महसूल हा वस्तूरूपांत तसेच रोख रकमेत गोळा केला जात असे. ऊस, कापूस तेलबिया या वस्तूंचे उत्पादन बाजारात विकण्यासाठी केले जात होते. कापड निर्मितीच्या उद्योगामध्ये वाढ झालेली होती. कापड निर्मितीचा उद्योग सर्व भारतभर होता. परंतु किनाऱ्यालगतच्या काही भागांमध्ये उच्च दर्जाच्या कापडाची निर्मिती केली जात असे व ते कापड मुख्य शहरांमध्ये तसेच इराण, मध्य आशिया, समुद्रमार्ग पश्चिम व दक्षिण-पूर्व आशिया आणि परदेशी व्यापारी कंपन्यांमार्फत युरोप, पश्चिम आफ्रिका येथे पाठविले जात होते. या आर्थिक उलाढालींमध्ये पतपुरवठ्याची उपलब्धता महत्त्वाची भूमिका पार पाडताना दिसते. कच्चा माल, बी बियाणे यासाठी कारागिर, शेतकरी पतपुरवठा करणाऱ्या व्यापाऱ्यांच्या मध्यस्थावर अवलंबून होते. बंदरांच्या ठिकाणी कार्यरत असणारे परदेशी व्यापारी स्थानिक व्यापाऱ्यांना पैशाचा पुरवठा करून वस्तूंच्या उपलब्धतेसाठी मदत करत. ग्रामीण भागांमध्येही वस्तूंची निर्मिती होत होती. विशेषतः कापड निर्मितीचा उल्लेख येथे करावयास हवा. शहरे, नगदे व कसबे ही आर्थिक उलाढालींची केंद्र होती.

१८ व्या शतकासंबंधीच्या वादंगाचे मराठ्यांच्या इतिहासाच्या संदर्भात विश्लेषण करताना आर्थिक क्षेत्रातील पिछेहाटीचे कोणतेच चिन्ह आपल्याला दिसत नाही. मराठी पुराभिलेखीय साधनांच्या मदतीने मराठ्यांच्या अंमलाखालील प्रदेशांमध्ये १८ व्या शतकात लागवडीखालील क्षेत्रात वाढ झालेली दिसते. कौलनामे देऊन नवीन जमीन लागवडीखाली आणण्याचे प्रयत्न राज्यकर्त्यांनी केले. लागवडीखालील क्षेत्र वाढल्यामुळे शेती उत्पादनामध्ये वाढ झाली. जनसंख्येमध्ये वाढ झाल्यामुळे शेती उत्पादनाला मागणी वाढली मराठ्यांच्या राज्य विस्तारामुळे महाराष्ट्राबाहेरून संपत्ती येण्याचे मार्ग उपलब्ध झाले. व्यापार या अर्थव्यवस्थेच्या दुसऱ्या घटकामध्येही स्थितीशिलता आढळत नाही. खेडे, कसबा, शहर ही अंतर्गत व्यापाराची केंद्रे जोमाने कार्यरत होती. किनाऱ्यालगतचा व्यापारही भरभराटीला आलेला होता. वसईप्रांतामधील बंदरांच्या जकातीच्या आकडेवारीच्या मदतीने वसई प्रांताचा गुजरातबरोबर असलेल्या व्यापाराच्या स्वरूपाची कल्पना येते. या काळात शहरीकरणाच्या प्रक्रियेला चालना मिळून पुणे, नाशिक, सोलापूर या सारखी शहरे भरभराटीला आली.

उत्तर भारत, मध्य भारतामध्ये आपली सत्ता स्थापन करणाऱ्या मराठ्यांकडे पारंपरिक मांडणीनुसार एक मोडतोड करणारी शक्ती म्हणून पाहिले जात होते. जो प्रदेश मराठ्यांनी जिंकून तेथे आपले प्रशासन उभे केले त्या माळवा, गुजरात, कर्नाटक या प्रांतावरील झालेल्या संशोधनामुळे हे चित्र आज पूर्ण बदललेले दिसते. स्टुअर्ट गॉर्डन आणि रिचर्डस यांनी खानदेशवर केलेल्या संशोधनानुसार तेथे मराठ्यांनी प्रभावी प्रशासन निर्माण केले व मुघल राज्याच्या पद्धतीनेच महसूल गोळा केला हे सांगितले आहे. खानदेशमध्ये मराठ्यांनी शेतीला कसे उत्तेजन दिले, व्यापारामध्ये कशी वाढ झाली हे दाखविले आहे. १८ व्या शतकाच्या शेवटापर्यंत शिंदे, गायकवाड, भोसले यांनी मोठे सैन्य बाळगले होते. हे सैन्य केवळ चौथाईच्या रकमेवर उभे नव्हते तर त्यांच्या अंमलाखालील प्रदेशांमध्ये त्यांनी जी परिणामकारक महसूल पद्धती लागू केली होती त्यावर आधारलेले होते.

भारतामध्ये काही प्रदेशांमध्ये आपणास अडथळे, मोडतोड दिसते. परंतु सर्व भारतामध्ये अशी परिस्थिती नव्हती. केंद्राकडून म्हणजे मुघलांकडून परिघ क्षेत्राकडे म्हणजे प्रादेशिक स्वायत्त सत्तांकडे झालेले सत्तेचे संक्रमण हे बंगाल, अवध येथे शांततापूर्ण होते. बंगालमध्ये मुर्शिलकुली खान याच्या काळात जमीन महसूलाच्या उत्पन्नामध्ये वाढ दिसते. अवध मध्येही अधिक महसूल जमा होणे तसेच नवीन बाजारपेठांची निर्मिती ही एका अर्थाने शेती उत्पादन वाढल्याचेच निदर्शक होय. फैजाबाद, लखनौ ही शहरे याच काळात भरभराटीला आली. तेथील लोकसंख्येत वाढ झाली. बनारस एक आर्थिक केंद्र म्हणून याच काळात भरभराटीला पोहोचले होते.

आज १८ व्या शतकाच्या पहिल्या स्थित्यंतरासंदर्भात








अशी मांडणी केली गेली आहे की मुघल साम्राज्याच्या पतनानंतर सर्व क्षेत्रांमध्ये पिछेहाट झाली नाही. हा काळ कायदा व सुव्यवस्था ढासळण्याचा नव्हता. १८ वे शतक हा राजकीय अराजकतेचा काळ नव्हता की ज्यामुळे ब्रिटिशांनी भारतामध्ये सत्ता स्थापन केली. याउलट प्रादेशिक इतिहासावरील नव्याने झालेल्या संशोधनामुळे हा काळ आर्थिक भरभराटीचा होता, असे सिद्ध झाले आहे. भारतातील ब्रिटिश सत्तेची स्थापना या स्थित्यंतरा संदर्भात वादंगाचा मुद्दा 'सातत्य की बदल' हा होता. ब्रिटिशांनी बंगालमध्ये प्रथम सत्ता स्थापन केली त्यामुळे बंगाल प्रांतावर विशेष व संख्येने विपुल संशोधन झाले. सी. ए. बेली, पी. जे. मार्शल, बर्टन स्टेन, दासगुप्ता यासारख्या इतिहासकारांनी अर्थकारणामधील 'सातत्य' यावर प्रकाश टाकला. ईस्ट इंडिया कंपनीने आर्थिक व सांस्कृतिक व्यवस्थाच चालू ठेवली अशा स्वरूपाची मांडणी त्यांनी केली. बी. बी. चौधरी सब्यासाची भट्टाचार्य यासारख्या इतिहासकारांनी ब्रिटिश सत्तास्थापनेमुळे शेती व शेती व्यतिरिक्त क्षेत्रातील महत्त्वाचे बदल अधोरेखित केले. त्यांनी आर्थिक शोषित संबंधावर भर दिला त्यामुळे त्यांना वसाहतवाद, हा एक सुस्पष्ट असंयोग (break) दिसतो. ज्या इतिहासकारांनी 'सातत्य' या सिद्धांताचा पाठपुरावा केला त्यांना 'पुनरावलोकन-वादी' म्हटले जाते कारण वासाहतिक अर्थकारणाकडे बघण्याचा दृष्टिकोण, समज त्यांनी बदलला.

थोडक्यात आज १८ व्या शतकाकडे इतिहासकार एकात्म, एकसंध घटक या दृष्टिकोणातून पाहतात. १८ वे शतक हा एकसंध काळ या परिप्रेक्षातून आज मांडणी केली जात आहे. सातत्य व बदल या परिमाणाच्या आधारेच १८ व्या शतकातील बदलांच्या स्वरूपाचे विवेचन केले जाते. मुघल, त्यांचे भारतीय वारस आणि आरंभीचे ब्रिटिश यांचे प्रशासन, अर्थकारण यामध्ये सातत्य दाखविले जाते. १८ व्या शतकात जी नवीन राजकीय व्यवस्था निर्माण झाली होती - उदा. अवध, बंगाल, हैद्राबाद-तेथील राज्यकर्त्यांनी आपल्या शहरांमध्ये मुस्लिम दरबारातील संस्कृती पुनः रूजवली. राज्याच्या प्रशासनामध्ये नवीन प्रवाह जरी त्यांनी आणले तरी मुघल प्रशासनाचेच आकृतिबंध व पद्धती त्यांनी स्वीकारल्या. अर्काटच्या नबाबाने दक्षिण भारतामध्ये आपले प्रशासन मुघल प्रशासकीय तत्त्वांवरच स्थापन केले होते. मराठ्यांनी सुद्धा उत्तर भारतामध्ये जेथे जेथे आपली सत्ता स्थापन केली, प्रशासन उभे केले तेथे मुघलांच्या तत्त्वानुसार सारा आकारणी केलेली दिसते. मुघल साम्राज्याच्या पतनानंतर मुघलांच्या आर्थिक व प्रशासकीय संस्था या कधी जशाच्या तश्या तर कधी वेगळे रूप घेऊन चालू होत्या. थोडक्यात प्रशासन, आर्थिक जीवन यामध्ये सातत्य होते. मुघल साम्राज्याच्या पतनानंतर आर्थिक पिछेहाट झाली नाही. प्लासीची लढाई व बक्सारची लढाई या छेद देणाऱ्या घटना मानल्या जात नाहीत. या लढाया भारतातील सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक जीवन विभागणाऱ्या घटना नव्हत्या. ज्याला आपण रचनात्मक बदल म्हणतो त्या बदलांची प्रक्रिया १९ व्या शतकाच्या दुसऱ्या दशकापासून सुरू होते.

**तळटीपा :-**


१. Sarkar, Sir Jadunath; History of Aurangzeb based on original sources, 5 Vols., Calcutta 1924 - 30, reprint 1973.

२. Habib, Irfan; The Agrarian System of Mughal India, 1556 - 1707, Delhi, 1963.

३. Ali M. Athar; The Mughal Nobility under Aurangzeb, revised edn. Delhi, 1997 first published at Aligarh, 1966.

४. Habib, Irfan, op. cit, p. 351.

५. Bayly, C. A.; Rulers, Townsmen and Bazaars : North Indian Society in the Age of British Expansion 1770 - 1870, Cambridge, 1983.

______; The new Cambridge History of India, II, I, Indian society and the Making of the British Empire, Cambridge, 1987.

६. Wink, Andre; Land and Sovereignty in India : Agrarian Society and politics under the Eighteenth-Century Maratha Svarajya, Cambridge, 1986.











७. Gordon, Stewart; The New Cambridge History of India, II, 4, The Marathas, 1630 - 1818, Cambridge, 1993.
_______; Marathas, Marauders and State - Formation in Eighteenth Century India, Delhi, 1994.

८. Guha Sumit; 'Potentates, Traders and Peasants : Western India, 1700 - 1870 in Stein Burton and Subrahmanyam Sanjay (Ed.), Institutions and Economic change in South India, Oxford University Press, 1996.

९. Alam Muzaffar; the Crisis of Empire in Mughal North India : Awadh and the Punjab 1707 - 1748, Delhi, 1986.

१०. Singh Chetan; Region and Empire : Punjab in the seventeenth century, Delhi, 1991.

११. Skaria Ajay, 'Being Jangli : The Politics of Wildness' in Marshall P. J. (Ed.) The Eighteenth Century in Indian History, Oxford University Press, Delhi, 2003.

☆☆☆



अनुक्रमणिका




# काल, आज आणि उद्या

## इतिहासाचा शोध आणि बोध

— साक्षी

पुण्यातील विख्यात भारत इतिहास संशोधक मंडळाशी माझा दुरून — जवळून गेल्या साठ वर्षांचा संबंध आहे. येवढ्या ह्या कवेत न मावणाऱ्या काळात मंडळाच्या रूपात अंतर्बाह्य बदल झाला आहे. १९५० च्या सुमारास, एक शाळकरी मुलगा असणारा मी, माझ्या इतिहास संशोधक आजोबांच्या चिठ्या घेऊन, मंडळाच्या ग्रंथालयातून पुस्तके आणण्यासाठी जात असे, तेव्हा मंडळाची इमारत सध्याचे राजवाडे सभागृह व त्याच्या पूर्व-पश्चिम बाजूस असणारी दोन पाखी एवढीच होती. पूर्वेकडच्या पाख्यात चार-खोल्या होत्या. त्यातील पहिल्या खोलीत वृद्ध गोपाळराव कुलकर्णी हे कारकून बसलेले असत. वर्गणीचे पैसे घेणे व पावती देणे एवढेच त्यांचे काम असे. शेजारच्या तीन खोल्यात 'रायगड स्मारक मंडळ', 'शिवचरित्रमंडळ', 'नगर संशोधन मंडळ' अशा पोट-मंडळाच्या कचेऱ्या होत्या. तेथे कोणी बसले आहे व काम करीत आहे, असे क्वचितच दिसत असे. पूर्वेकडच्या पाख्यात खोल्या नव्हत्या. एकच एक लांब मोठे दालन होते. तेथे मंडळापाशी असलेला सर्व ऐतिहासिक ठेवा मांडून ठेवला होता. उंच लाकडी खांबांवर फिरत्या चौकटी लावल्या होत्या. चौकटीतून सुरेख, रेखीव, रंगीबेरंगी लघुचित्रे बसविलेली होती. रागिण्यांची चित्रे, ऋतूंची चित्रे, पोथ्यातून वेगळी केलेली देव-देवतांची चित्रे, ऐतिहासिक पुरुषांची व्यक्तिचित्रे अशी नाना परींची चित्रे त्या चौकटीतून असत. खेरीज काचेच्या पेट्यातून ठेवलेली नाणी, तालपत्रांवर लिहिलेल्या पोथ्या, कागदांवर लिहिलेल्या हस्तलिखित पोथ्या यांचा एक विभाग त्याच दालनात होता. आम्हा मुलांच्या आवडीच्या वस्तू म्हणजे तरवारी, ढाली, भाले, बर्च्या, तोफा, बंदुका, तोफगोळे, वाघनखे. या वस्तू पाहिल्या की, शिवाजी महाराज, संभाजीराजे, तानाजी, पहिले बाजीराव यांची घोडदौड मनात सुरू व्हावयाची. खेरीज नाना फडणिसांचा मोठा अंगरखा, चिलखते, हस्तीदंती पेट्या अशा नवलाईच्या चिजा तेथे खच्चून लावलेल्या होत्या. याच दालनात एका टेबलापाशी, हातात पुस्तक घेऊन तात्या खरे वाचत बसलेले असत. मी आजोबांची चिठी त्यांना दिली की त्या चिठीची व्यवस्था लावून तात्या मोठ्या आस्थेने मला पूर्ण संग्रहालय हिंडून दाखवीत.

मुख्य सभागृहाला तेव्हा राजवाडे सभागृह हे नाव नव्हते. या सभागृहात एक भले थोरले लंबगोल व हिरवे आच्छादन असलेले मेज ठेवलेले होते. त्या मेजवर मंडळात आलेली नियतकालिके व्यवस्थेने ठेवलेली असत व भोवताली जड लाकडी खुर्च्या मांडलेल्या असत. तीन-चार अभ्यासक तेथे नेहमी, एकमेकाशी अजिबात न बोलता, काही ना काही पुस्तके वाचत बसलेले असत. त्यांच्यात काहीच संभाषण झालेले मी पाहिले नसल्याने मला वाटे की, कोणत्या तरी ऐतिहासिक प्रश्नावरून यांच्यात भांडण झालेले असावे. या सभागृहाच्या मातीच्या जाड भिंतीत ग्रंथालयाची पुस्तके लावलेली होती. या कपाटांना 'श्री-भा-र-त-इ-ति-हा-स-सं-शो-ध-क-मं-ड-ळ' अशी अक्षरनावे दिलेली होती. ग्रंथालयाच्या नोंदवहीत पुस्तके देखील या अक्षरांच्या रकान्यातून वाटलेली होती. माझ्या आजोबांना हवे असलेले पुस्तक तात्या या कपाटातून काढून देत. कधी त्यांना पुस्तक काढण्यासाठी लाकडी घोडाही वापरावा लागे.

या मुख्य इमारतीच्या बाहेर, पूर्वेच्या अंगाला, एक खपरेल होते व अजूनही आहे. त्या खपरेलात मंडळाच्या सेवेत असलेले संशोधक शंकरराव जोशी, तात्या खरे वगैरे राहात असत. या खपरेलाला रुंदी फारच कमी होती व लांबी लक्षात राहण्याजोगी होती. त्यामुळे प्रत्येक खोली चिंचोळी व लांबट असे. खोल्यांना फरशी नव्हती तर सारवलेली जमीन होती. पावसाळ्यात या जमिनीतून ओल येत असे. मुख्य सभागृहाच्या मातीच्या भिंतीतूनही ओल वर झिरपत जाई व पुस्तकांवर बुरशी चढे.

मंडळाचे कार्याध्यक्ष तेव्हा म. म. दत्तो वामन पोतदार होते. पण ते मंडळात कधी-मधीच दिसत. जेव्हा असत




तेव्हा त्यांच्या भोवती चार-पाच व्यक्तींचा घोळका असे व पोतदार त्यांच्या रसाळ भाषेत चटकदार गप्पा मारीत असत. पण नेहमी असणारी माणसे म्हणजे तात्या खरे, शंकरराव जोशी आणि गोपाळराव कुलकर्णी, दर पंधरा-वड्याला पाक्षिक-सभा होई. वार्षिक संमेलन मे महिन्यात असे. तेव्हा मात्र बराच मोठा मनुष्यमेळा जमत असे. बहुधा पोतदार अध्यक्षपदी असत व सभेवर चोख नियत्रंण ठेवीत.

आता सुमारे साठ वर्षांनंतर मंडळाचे स्वरूप खूपच पालटले आहे. जुन्या इमारतीच्या मागे नऊ विस्तृत दालनांची टोलेजंग तीन मजली इमारत आहे. त्या इमारतीत चित्र-शाळा, संग्रहालय, पोथीशाळा, ग्रंथालय, दफ्तरखाना ही मंडळाची उपांगे वस्तीला राहिली आहेत. वातनुकूलित पोतदार सभागृह थाटण्यात आले असून पाक्षिक-सभा, चर्चासत्रे, वार्षिक संमेलनातील निबंध-वाचन यांच्यासाठी जागा उपलब्ध झाली आहे. एका दालनात तीन अभ्यासिका तयार केल्या आहेत. ज्यांनी संशोधन-प्रकल्प हाती घेतला आहे त्यांना अभ्यासासाठी त्या वापरता येतात. एक प्रयोग-शाळा तयार केली असून तेथे चित्रे, मूर्ती, ऐतिहासिक वस्तू यांच्यावर जतन संस्कार करण्याचे काम चालते. जुन्या कर्मचारी निवासात फरश्या, पंखे, वीजनळ्या बसवून मोडी किंवा फारसी कागद गटाने वाचणाऱ्यांची सोय लावली आहे.

मंडळापाशी भरपूर ऐतिहासिक सामग्री आहे. सात लाखाच्या आसपास दस्तऐवज आहेत. ते, मोडी लिपीत लिहिलेले मराठी कागद, फारसी फर्माने व पत्रे, कानडी कागद अशा स्वरूपाचे आहेत. चाळीस हजार पोथ्या आहेत. संस्कृत, फारसी, मराठी, कानडी अशा भाषातल्या या पोथ्या असून काहीमध्ये देखणी चित्रे आहेत. मंडळाच्या ग्रंथालयात सुमारे तीस हजार ग्रंथ आहेत. त्यातील काही अगदी दुर्मिळ आहेत. १६८७ साली छापलेले एक इंग्रजी पुस्तक आहे. इटालियन फिरस्त्याने लिहिलेल्या हिंदु-स्थानच्या वर्णनाचे ते इंग्रजी भाषांतर आहे. खेरीज नकाशे, एकोणिसाव्या शतकातील वृत्तपत्रे, नियतकालिके यांचा मोठा संग्रह ग्रंथालयात आहे. मंडळापाशी सुमारे बाराशे चित्रे आहेत. त्यात लघुचित्रे, काचचित्रे, इंग्रजपूर्व रंगीत नकाशे, किल्ल्यांची चित्रे व छायाचित्रे यांचा समावेश आहे. संग्रहालयात ताम्रपट, जिजाबाईसाहेब व शहाजीराजे यांची पत्रे, दादाजी कोंडदेव, सर्व पेशवे व छत्रपती यांची पत्रे, शस्त्रे, उत्खननात सापडलेल्या वस्तू, मूर्ती, शिलालेख ठेवलेले आहेत. मंडळाकडे प्राचीन व अर्वाचीन नाण्यांचा मोठा संग्रह असून त्यातील कित्येक नाणी फार दुर्मिळ आहेत. यंदा शंभराव्या वर्षी मंडळाने आपल्या या ऐति-हासिक ठेव्याची प्रदर्शने दोनदा भरविली तेव्हा पुण्याच्या व बाहेरच्याही नागरिकांनी त्या प्रदर्शनांना उत्साहाने भेट दिली व कौतुकाने भरलेले अभिप्राय लिहून ठेवले. दोन्ही प्रदर्शने मिळून दहा हजार इतिहासप्रेमी मंडळाला भेट देऊन गेले.

वस्तुभाव व वास्तुभाव या दोन्ही अंगांनी मंडळाचा हा स्पृहणीय विस्तार झाला आहे. त्याबरोबरच इतिहासा-विषयी आस्था बाळगणाऱ्या व संशोधन करू इच्छिणाऱ्या व्यक्तींचे ते एक यात्रास्थानही झाले आहे. अनेक देशी-परदेशी अभ्यासक इथे येतात व येथील संशोधन सामग्रीचा उपयोग करून आपले शोधनिबंध पूर्णत्वाला नेतात. रशिया, जॉर्जिया, जपान, अमेरिका, बेल्जियम व इंग्लंड या देशातील अभ्यासक मंडळाचे सभासद आहेत. विख्यात 'केंब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया' या बहुखंडीय इतिहास-ग्रंथाच्या १८ व्या शतकाच्या खंडाचे संपादक प्रा. बेली मंडळात येऊन मराठी व मोडीलिपी शिकले आणि महा-राष्ट्राच्या इतिहासाच्या अनेक पैलूंवर त्यांनी विद्वत्तापूर्ण संशोधन केले. आजचे नामांकित संशोधक श्री. गजानन मेहेंदळे, निनाद बेडेकर, डॉ.चंद्रकांत अभंग, डॉ. सुमित्रा कुलकर्णी हे देखील मंडळात अभ्यास करूनच मोठ्या पदवीला चढले आहेत.

(१)

महाराष्ट्रात आधुनिक शिस्तीने इतिहासाचा शोध घेण्याची सुरुवात ग्रँट डफच्या इतिहासावर टीका करण्याच्या निमित्ताने झाली. ग्रँट डफ हा कंपनीसरकारच्या नोकरीतील अधिकारी साताऱ्याच्या प्रतापसिंहमहाराजांच्या दरबारी कंपनीचा रेसिडेन्ट म्हणून होता. त्याने सातारकरांच्या दफ्तरखान्यातील कागदपत्रे व बखरी यांचा उपयोग करून मराठ्यांचा इतिहास सजविला (१८२६). हिंदुस्थानातील इंग्रजी अंमलाचे समर्थन करण्याच्या हेतूने इतिहास लिहिण्याची सुरुवात जेम्स मिल (१७७३-१८३६) याने

१८१७ साली 'ब्रिटिशांच्या अंमलाखालील हिंदुस्थानाचा इतिहास' लिहून केली होती. मिलचे म्हणणे होते की, मनुष्यजातीची प्रगती होत आहे; त्या प्रगतीला कोणत्या संस्कृतीने किती हातभार लावला या निकषावर त्या संस्कृतीचे मूल्यमापन केले पाहिजे. त्या निकषावर हिंदुस्थानची संस्कृती तपासली तर हिंदी समाज जगाच्या मुख्य प्रवाहापासून एखाद्या डबक्यासारखा अलग पडला आहे, असे दिसते. त्या समाजाला इतिहासाच्या मुख्य प्रवाहात आणून सोडण्याचे काम ब्रिटिश राज्यकर्त्यांनी करायला हवे. ग्रँट डफचे म्हणणे असे होते की, नुकताच इंग्रजांनी पेशव्यांचा पराभव करून महाराष्ट्राचे राज्य जिंकून घेतले त्या वेळी पराभव केवळ पेशव्यांचा किंवा मराठी राजकर्त्यांचा झाला आहे असे नाही तर तो अप्रगत अशा मराठी समाजाचा इंग्रजी समाजासारख्या प्रगत समाजाने केलेला तो पराभव होता.

नव्याने सुरू झालेले इंग्रजी शिक्षण घेतलेल्या मराठी विद्वानांना डफच्या इतिहासातील हा विस्तार फार झोंबला व त्यांनी डफच्या इतिहासातील तपशिलांच्या चुका हिरीरीने दाखवायला सुरुवात केली. ज्याला ग्रामशी हा इटालियन विचारवंत 'भूमिका युद्ध' असे नाव देतो. त्या भूमिका युद्धाचीच ही मराठी आवृत्ती होती. 'भूमिका युद्ध' या संकल्पनेचे स्थूल स्वरूप असे की, सांस्कृतिक वर्चस्व गाजविणारा वर्ग आपली जी बलस्थाने असल्याचे मिरवीत असतो त्या बलस्थानांवर अंकित वर्गाने हल्ला चढवावयाचा. या डफ-विरोधी टीकेच्या निमित्ताने जुन्या मराठी दस्तऐवजांचा शोध घेणे, ती एकत्र आणणे, वाचून देवनागरी लिप्यंतर करून प्रसिद्ध करणे या उद्योगाला सुरुवात झाली. 'काव्येतिहाससंग्रह' या मासिकातून जुनी मराठी कविता, तह व करारनामे, बखरी व करिने आणि कैफियती प्रसिद्ध झाल्या. पुढे 'भारतवर्ष' या मासिकाने हीच कामगिरी चालू ठेवली. पण ऐतिहासिक दस्तऐवज गोळा करणे, वाचणे व प्रसिद्ध करणे या कार्याला चळवळीचे रूप आले ते (पुढे इतिहासाचार्य झालेल्या) राजवाड्यांनी 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या नावाने एक ग्रंथमालाच सुरू केली तेव्हा वाईच्या एरंडे घराण्याकडून राजवाड्यांना पानिपतच्या प्रसंगाशी संबंधित अशा कागदांचा रुमालच मिळाला. 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या मालेचा पहिला खंड राजवाड्यांनी या संग्रहातील पत्रे छापून तयार केला.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्रातील इतिहास संशोधन बहराला आले होते. राजवाडे, वासुदेवशास्त्री खरे, का. ना. साने, द. ब. पारसनिस, चिं. ग. वैद्य, (रियासतकार) गो. स. सरदेसाई अशी नावाजलेली विद्वान माणसे बहुत कष्ट घेऊन व हिरिरीने कागदपत्रे, पोथ्या यांचा शोध घेत होती. जुन्या गढ्या, मठ, देवस्थाने यांना भेट देऊन दस्तऐवज गोळा करीत होती. ही साधनसामग्री एकत्र ठेवावी कोठे, या दस्तऐवजांच्या प्रकाशनाची काय व्यवस्था करावी, इतिहास-संशोधकांना आपले नवे शोध मांडून त्यावर चर्चा घडवून आणायची असेल तर त्यासाठी कोणती सोय करावी अश्या अडचणी निर्माण झाल्या होत्या. विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात वंगभंगाची मोठी चळवळ झाली. टिळकांच्या नेतृत्वाखाली 'राष्ट्रीय पक्ष' हा स्वराज्यासाठी त्वेषाने चळवळ करणारा पक्ष उदयाला आला. त्याच काळात 'अभिनव भारत' या गुप्त संघटनेच्या नेतृत्वाखाली सशस्त्र क्रांतीचे प्रयत्न सुरू झाले. त्याला उत्तर म्हणून इंग्रज सरकारने १९०८ ते १९१० या काळात प्रचंड दडपशाही केली. राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांना तुरुगांत टाकले, वृत्तपत्रांवर जाचक निर्बंध घातले, क्रांतिकारकांना फासावर चढविले व त्यांच्या कुटुंबियांचे हालहाल केले. कोवळ्या गवतावर जड दगड ठेवून गवत दडपून टाकावे त्याप्रमाणे राष्ट्रवादाचे अंकुर भुईसपाट करण्यात आले.

अशा धामधुमीच्या काळात राजवाड्यांनी 'भारत इतिहास संशोधक मंडळा'ची स्थापना केली. देशातील राष्ट्रप्रेमाची भावना जागरुक ठेवायला इतिहासाचे संकीर्तन हा नामी उपाय होता. सरकारलाही त्यावर दडपशाहीचा वरवंटा फिरवणे अवघड गेले असते. शिवाजी महाराज व पेशवाई यांच्या काळात मराठ्यांनी केलेले पराक्रम लोकांच्या समोर मांडले गेले तर लोकांमध्ये आत्मसन्मान, राष्ट्रप्रेम, पूर्वजांविषयीची आपुलकी व अभिमान या भावना निःसंशय वाढीला लागल्या असत्या. ह्या सर्व गोष्टी लक्षात घेऊन राजवाड्यांनी आपल्या बरोबरीच्या सहकाऱ्यांशी दीर्घकाळ व सखोल विचारविनिमय करून आषाढ शुद्ध प्रतिपदा शके १८३२ म्हणजे ७ जुलै १९१०








या दिवशी आप्पा बळवंत चौकातील सरदार मेहेंदळ्यांच्या वाड्यात 'भारत इतिहास संशोधक मंडळा' ची स्थापना केली.

प्रथम पासूनच मंडळाचा भर छत्रपती महाराजां-विषयीचे अस्सल दस्तऐवज गोळा करण्यावर व ते प्रसिद्ध करण्यावर होता. शिवाजी महाराजांच्या काळातील कागदपत्र मिळणे अवघड होते. त्या मानाने पेशवेकालीन कागदपत्र भरपूर प्रमाणात उपलब्ध होते. ही कागदपत्र गोळा करणे, कालक्रमाने लावणे, त्यांचे बालबोधीत लिप्यंतर करून ते प्रसिद्ध करणे हाच मंडळाचा अखंड उद्योग होऊन बसला आहे. याबाबतीत मंडळाने केलेली कामगिरी केवळ अजोड अशी आहे. 'शिवकालीन पत्रसार-संग्रह' (तीन खंड, 'रायगड स्मारक मंडळा'च्या सहाय्याने), 'शिवचरित्रसाहित्य' (१४ खंड), 'शिवभारत' हे कवींद्र परमानंदाने लिहिलेले महाराजांचे समकालीन चरित्र, 'ऐति-हासिक फार्सी साहित्य' (४ खंड), 'दक्षिणच्या इतिहासाची साधने' (४ खंड) असे केवढे तरी कागद मंडळाने मोठी आर्थिक जोखीम पत्करून प्रसिद्ध केले. निरनिराळ्या घराण्यांकडे असलेल्या कागदपत्रांपैकी कागदपत्र निवडून मंडळाने त्यांचे संग्रह प्रसिद्ध केले. 'हिंगणे दफ्तर', 'पुरंदरे दफ्तर', 'तुळशीबागवाले दफ्तर', 'गद्रे सावकारांचे कागद' असे कितीतरी संग्रह मंडळाने प्रसिद्ध केले आहेत. सारांश, संशोधकांना लागणारा कच्चा माल मंडळाने मोठ्या प्रमाणावर तयार केला आहे.

मंडळाने स्वत: कोणताच इतिहास-ग्रंथ एखादा प्रकल्प म्हणून हाती घेतला व लिहून सिद्धीस नेला असे झाले नाही, असा आक्षेप क्वचित् घेतला जातो. पण मंडळाने महाराष्ट्राचा, शिवछत्रपतींचा किंवा कोण्या पेशव्याचा साधार व एकसंध इतिहास लिहावा, असे स्वत:चे कर्तव्य मानलेलेच नाही. ज्या संशोधकाला असे काम करावयाचे असेल त्याला कागदपत्रे व इतर सामग्री पुरविणे एवढेच मंडळाचे काम आहे. इतिहासाची साधने जमविणे निराळे व इतिहास लिहिणे निराळे. आजही सरकार, स्थानिक स्वराज्य संस्था किंवा इतर प्रशासकीय अधिकारी काही वादग्रस्त मुद्द्यांवर मंडळाचे मत मागवितात. उदा. शिवाजी महाराजांचा 'लालमहाल' ज्या जागी होता तेथे पुणे महानगर पालिकेने एक इमारत बांधली व त्या इमारतीच्या एका दालनात महाराजांच्या आयुष्यातील प्रसंग दाखविणारे देखावे तयार केले. त्यापैकी एका देखाव्यात दादाजी कोंडदेव, जिजाऊसाहेब व शिवाजीराजे सोन्याच्या नांगराने पुण्याची जमीन नांगरत आहेत असे दाखविले होते. त्या देखाव्यातील दादाजी कोंडदेव यांची प्रतिमा नको; दादाजींचा या प्रसंगाशी काही संबंध नव्हता, असा आक्षेप काही संघटनांनी घेतला. तेव्हा महानगरपालिकेने या मुद्द्यावर मंडळाचे मत मागविले. मंडळाने महानगरपालिकेला कळविले की, 'मंडळाला स्वत:चे असे मत कोणत्याच मुद्द्यावर असत नाही. मंडळाशी संबंधित संशोधकांना त्यांची त्यांची मते असतात. मंडळ फक्त या, किंवा अशा, मुद्द्यांवर ऐतिहासिक कागदपत्रातील उल्लेख नोंदवू शकते. मत ज्याचे त्याने बनवायचे असते.'

मंडळाने स्वत:साठी जे काम नेमून घेतले आहे त्याच्याशी सुसंगत अशीच ही भूमिका आहे. इतिहास-लेखन हे मंडळाने आपले काम मानले नाही; इतिहासाचे संशोधन हेही मंडळाचे काम नाही; इतिहास संशोधकांना आवश्यक असे कागदपत्र व इतर सामग्री जतन करणे व व्यवस्थित लावून ठेवणे एवढेच मर्यादित काम मंडळाचे आहे. त्या कामाचा एक सुसंगत विस्तार म्हणून मंडळ मूळ कागदपत्र यथावत् प्रसिद्ध करते. त्या संग्रहांना ज्या प्रस्तावना असतात त्या संपादकांच्या असतात; त्यातील मते मंडळाची नसतात. सारांश, 'पद्मपत्रमिवाम्भसा' अशी मंडळाची व्रतस्थ वृत्ती आहे.

(२)

प्रत्यक्ष इतिहास-लेखन हे मंडळाचे काम नाही; इतिहास-संशोधकांनी जमा केलेली ऐतिहासिक सामग्री व्यवस्थेने लावून जतन करणे हे मंडळाने स्वत:चे कार्य म्हणून निवडले आहे, हे ठीकच आहे. पण इतिहास-संशोधनाशी संबंधित असणारी अग्रगण्य संस्था ऐतिहासिक दस्तऐवजांच्या संग्रहातच गुंतून राहिल्याने महाराष्ट्रातील इतिहास-लेखनावर काहीसा विपरीत परिणाम झाला हे म्हणणे आवडणारे नसले तरी त्यात मुद्दा आहे; हे मान्य करावे लागेल.

अठराव्या शतकात युरोपात 'ज्ञानोदयाचा कालखंड' (एज ऑफ एनलायटनमेंट) अवतरला; आणि गतकाळाचा आधुनिक व वैज्ञानिक दृष्टीने शोध घेतला पाहिजे, असा

विचार सुरू झाला. या नवीन विचाराचे प्रतिबिंब मॉंटेस्क्यू (१६८९-१७५५) या विचारवंताच्या 'स्पिरिट ऑफ द लॉज' (१७५०) या ग्रंथात पडल्याचे आढळते. या ग्रंथात निरनिराळ्या प्रकारच्या शासनव्यवस्थांचा (उदा. राजे-शाही, हुकूमशाही, मर्यादित लोकशाही इ.) इहवादी भूमिके-तून परामर्श घेतला होता. या ग्रंथावर चर्चने बंदी घातली होती तरी दोन वर्षांत त्याच्या बावीस आवृत्त्या निघाल्या. ग्रंथ, त्यावेळच्या प्रघातानुरूप, संवादरूपाने लिहिला होता. तर हेगेल (१७७०–१८३१) ने इतिहासातील विविध कालखंडातून 'विश्वचैतन्या'च्या आविष्काराच्या चढत्या पायऱ्या दिसून येतात असा विचार मांडला. गतकाळाचा शोध समकालीन परिप्रेक्ष्यातून घेणे हे इतिहासलेखनाचे उद्दिष्ट असले पाहिजे, असा विचार या काळात मूळ धरू लागला. याच दृष्टिकोणातून युरोपातील विद्यापीठातून इतिहासाचे अध्ययन व अध्यापन सुरू झाले.

शास्त्रीय पद्धतीने गतकाळाचा अभ्यास या कल्पनेला प्रत्यक्ष इतिहास–लेखन करून अर्थ दिला तो लिओपोल्ड फॉन रांके (१७९५–१८८६) या बर्लिन विद्यापीठातील प्राध्यापकाने 'यथावत् – म्हणजे घडला तसा–इतिहास लिहिला पाहिजे' हे रांकेचे ब्रीद होते. रांकेने म्हटले होते की, 'वर्तमान जगाला भविष्यकाळाविषयी धडे देण्याच्या दृष्टीने इतिहास लिहिला जावा, अशी सार्वत्रिक समजूत आहे. पण मी लिहिलेला इतिहास ह्या समजुतीला धरून नाही. मी लिहिलेला इतिहास हा गतगोष्टी कशा घडल्या इतकेच फक्त सांगतो.' सारांश, सद्यःकाळात उपयोगी पडतील असे बोध गतकाळाच्या अभ्यासातून घेण्यापेक्षा गतगोष्टींविषयी अस्सल पुरावे शोधून त्या घटना यथावत् उभ्या करावयाच्या इतकाच माफक उद्देश इतिहासाचा असावा, असे रांकेचे म्हणणे होते. स्वतः रांकेने व्हिएन्ना, व्हेनिस, रोम व फ्लॉरेन्स येथील दफ्तरखाने तपासून व अस्सल कागदपत्रांचा शोध घेऊन आपल्या ब्रीदाला साजेसे अनेक इतिहास लिहिले. रांकेची ही विचारसरणी व तिला अनुसरून त्याने लिहिलेले इतिहास यांचा मोठा प्रभाव युरोपातील इतिहास–लेखन–कलेवर पडला होता आणि इतिहासाचार्य राजवाडे यांनाही हे तत्त्व मान्य होते. (स्वतः त्यांनी इतिहास–लेखन केले त्यात मात्र त्यांच्या प्रतिभेने दस्तऐवजी लढ्यांवर अनेकदा कुरघोडी केली, असे दिसून येते.)

इतिहास म्हणजे यथावत् हकीकत हे रांकेचे मत सर्वमान्य होते असे मात्र नाही. रांकेचा समकालीन कार्ल मार्क्स (१८१८–१८८३) ह्याला तर ते अजिबातच मान्य नव्हते. रांके बर्लिन विद्यापीठात प्राध्यापक असताना मार्क्स तेथे विद्यार्थी होता. रांके व त्यांचे अनुयायी यांची तो टवाळी करीत असे. मार्क्स हा हेगेलचा अनुयायी होता. इतिहासाला काही कथासूत्र असते हे हेगेलचे मत मार्क्सला मान्य होते. मात्र इतिहास म्हणजे विश्वचैतन्याचे प्रकटीकरण होय ही हेगेलची भूमिका मार्क्सने नाकारली. मनुष्यसमाज हा उपभोग्य वस्तू व सेवा यांच्या उत्पादनात गुंतलेला असतो. या प्रक्रियेत भाग घेताना समाजात अनेक वर्ग निर्माण होतात व त्या वर्गा–वर्गातले संबंध बहुधा झगड्याच्या किंवा स्पर्धेच्या स्वरूपाचे असतात. समाज वस्तुनिर्मितीची नवनवीन तंत्रे व साधने तयार करतो. वर्गा–वर्गातील लढ्यातून समाजाचे विकासाच्या वरच्या पायऱ्यांवर संक्रमण होते. सारांश इतिहास हा मानवी समाजाच्या उन्नयनाचा इतिहास आहे. मार्क्सचे इतिहासा-विषयी जे विचार होते त्यात तीन सूत्रे होती. पहिले, इतिहास हे एक महाकथानक (ग्रँड नॅरेटिव्ह) असून त्याचा शेवट संपन्न अशा साम्यवादी समाजरचनेत होणार आहे. त्यानंतर इतिहासाचा शेवट होईल; कारण जीवनकलह संपलेला असेल. दुसरे, निसर्गातील घडामोडींसंबंधाने ज्याप्रमाणे नियम बसविता येतात त्याप्रमाणे सामाजिक व ऐतिहासिक बदलांच्या विषयी देखील नियम बसविता येतात. तिसरे सूत्र हे की, मनुष्य हा इतिहासाचा कर्ता आहे; त्याच्या कर्तृत्वाने परिस्थिती बदलते. तो केवळ साक्षी नाही किंवा इतिहासाच्या हातातले बाहुले नाही.

मार्क्सच्या या प्रतिपादनातील शंकास्पद मुद्दे अनेकांनी दाखवून दिले असले तरी मार्क्सच्या प्रभावी विवेचनातून इतिहास लेखनाला नवी दिशा मिळाली. समाजाच्या विका-साचे काही नियम आहेत (त्या नियमाप्रमाणे विकास घडवून आणायला प्रबुद्ध व कर्त्या पुरुषांची गरज लागतेच) व ते शोधल्याने सापडतात ह्यावर मार्क्सने जो भर दिला त्यामुळे महापुरुष व त्यांच्या इच्छा–आकांक्षा यांना पारं-परिक इतिहास–लेखनात जे महत्त्व होते ते नवीन इति-हास–लेखनात कमी होऊन आर्थिक व सामाजिक रचना

आणि वर्गीय प्रेरणा यांचा विचार सुरू झाला. घटिताचे यथार्थ वर्णन हा जो रांके व त्याचे अनुयायी यांचा बाणा होता त्याला मार्क्सने हे बळकट आव्हान दिले. घटनेच्या यथार्थ वर्णनापेक्षा त्या घटनेच्या मागील 'सत्य' शोधणे ही इतिहास-लेखनाची कसोटी मानली जाऊ लागली. इतिहास–लेखनाचे मार्क्सने घडविलेले हे प्रारूप पुढे साम्यवादी प्रशासने आलेल्या देशातील विद्यापीठातूनच मान्यता पावले असे नव्हे तर भांडवलशाही व उदारमतवादी देशांच्या विद्यापीठातूनही विचारांना व विश्लेषणाला उपयोगी असे एक संकल्पनात्मक उपकरण म्हणून मार्क्सवादी इतिहास-लेखन–कलेचा उपयोग करण्यात आला. अर्थात मार्क्सवादी इतिहास–लेखनकला (हिस्टोरि-योग्राफी) स्वीकारताना या देशातील विचारवंतांनी आपापल्या मूळ--स्वभावाला साजेशी डूबही त्या कलेला दिली.

इतिहासलेखनाची रांकेने पुरस्कारिलेली यथावत् इतिहासाची परंपरा आणि हेगेल–मार्क्स यांची महाकथानक परंपरा (हेगेल विश्वचैतन्यवादी होता तर मार्क्स हा वर्गसंग्रहवादी होता असे स्थूलमानाने म्हणू) या दोन्ही परंपरांचे उगमस्थान ज्ञानोदयाची (एन्लाइटनमेंट) चळवळ हेच होते. विसाव्या शतकात या परंपरांना आव्हान देणाऱ्या निरनिराळ्या विचारसरणी पुढे आल्या. शिखरस्थ राज-कारण आणि आंतरराष्ट्रीय संबंध यांना केंद्रस्थानी ठेवून लिहिणाऱ्या इतिहासकारांशी कामगारचळवळीचा, सामा-जिक बदलांचा किंवा स्त्रीवादी विचारांचा वेध घेणारे इतिहासकार स्पर्धा करू लागले; या इतिहासकारांनाही सांस्कृतिक आणि सामाजिक मनोवृत्तीतील बदलांचा मागोवा घेणारे इतिहासकार आव्हान देऊ लागले. नाना प्रकारचे नवीन विषय ऐरणीवर आले व त्यांच्याविषयी लिहिताना जुनी मानके (नॉर्म्स), जुनी प्रमाणे व पुरावे उपयोगी पडेनासे झाले. पद्धतिशास्त्र आणि सिद्धान्त यांच्याविषयी एकोणिसाव्या शतकात झालेले वादंग आता गैरलागू वाटू लागले. पुरुषश्रेष्ठांच्या इच्छा–आकांक्षा, त्यांचे पराक्रम व हालचाली, त्यांच्या बाबतीत झालेल्या आकस्मिक घडामोडी, परिस्थितीत उपस्थित असलेल्या घटकांच्या विचित्र संयोगांमुळे निर्माण झालेले प्रसंग, या पुरुषश्रेष्ठांच्या कर्तृत्वातून अनपेक्षितपणे उत्पन्न झालेले परिणाम इत्यादींचा अभ्यास करणाऱ्या पारंपरिक इतिहासांना महत्त्व उरले नाही. त्यांच्या पेक्षा काही अभ्युपगम मनाशी धरून इतिहासातील घटनांचे विश्लेषण करणारे अभ्यास मान्यता पावू लागले. या अभ्यासासाठी वापरावयाच्या, तुलनात्मक आणि संख्यात्मक विश्लेषणाच्या बौद्धिक क्लृप्त्याही विकसित झाल्या. सारांश, प्रदीर्घ अशा विसाव्या शतकात इतिहासाचा अभ्यास विविध शाखा व त्यांना आलेली फळे व फुले यांनी बहरून गेला. या गजबजाटात रांकेचे 'यथावत् इतिहासा'चे लक्ष्य गळबटूनच गेले.

'विज्ञानाचा इतिहास' ह्या शाखेच्या अभ्यासाला १९ व्या शतकाच्या मध्यालाच सुरुवात झाली होती. 'विज्ञानाचे तत्त्वज्ञान' हा विषय १९३० सालानंतर पद्धतशीर रीतीने अभ्यासला जाऊ लागला. कार्ल पॉपर (१९०२–१९९४) यांनी 'वैज्ञानिक शोधाचे तर्कशास्त्र' (द लॉजिक ऑफ सायंटिफिक डिस्कव्हरी) हा ग्रंथ १९३४ साली मुळात जर्मन भाषेत लिहिला. त्याचे इंग्रजी भाषांतर १९५९ साली प्रसिद्ध झाले. 'विज्ञानाचा इतिहास' व 'विज्ञानाचे तत्त्वज्ञान' या ज्ञानशाखांचा संबंध अतूट आहे. त्यांचे नाते 'आंधळ्या-पांगळ्या'च्या परस्पर साह्यहारी नात्याप्रमाणे आहे असे म्हटले जाते. 'शोध कसा लागला' याची यथावत् हकीकत न सांगता संशोधनाचे विशिष्ट प्रारूप मनाशी धरून त्या साच्यात विशिष्ट शोध बसवता येतो का, हे पाहणे. या पद्धतीने या ज्ञानशाखांचे संयुक्तपणे कार्य चालते. १९६२ साली थॉमस कुन्ह (१९२२–१९९६) याने 'द स्ट्रक्चर ऑफ सायंटिफिक रिव्होल्यूशन्स' ('वैज्ञानिक क्रांतीची घडण') म्हणून ग्रंथ लिहिला. या ग्रंथात विज्ञानात नेहमी प्रगतीच होत असते, विज्ञानातून मनुष्याचे सृष्टीविषयीचे ज्ञान वाढतच जाते, या वाढीचा आलेख सरळ रेषेत वर चढत असतो इत्यादी समजुतींना धक्का देणारे विचार मांडले होते. कुन्हचे म्हणणे असे होते की, विज्ञानात प्रगती होते ती उलथा–पालथ होऊन घडून येते. सृष्टीतील घडामोडींचे निरीक्षण करण्याची, त्यांचे वर्णन करण्याची आणि त्या घडामोडींचे खुलासे देण्याची एक प्रस्थापित पद्धती उलथून टाकून तिच्याजागी दुसऱ्या पद्धतीची स्थापना केली जाते तेव्हा मोठी झेप घेतली जाते. ही जी उलथापालथ होते तिला कुन्हने 'पॅरडाईम चेंज' म्हणजे 'विश्वाविषयीच्या समजुतीतील सर्वांगीण बदल' असे नाव दिले होते. 'पॅर-डाईम चेंज' हा अभ्युपगम (हायपोथेसिस) मनाशी धरून

कुन्हने तो अभ्युपगम ग्रहमालेविषयीची टॉलेमीची उपपत्ती सोडून देण्यापासून कोपर्निकसची उपपत्ती स्वीकारण्यापर्यंत जो वैचारिक प्रवास झाला त्याला चपखलपणे लावून दाखविला होता. इतिहास–लेखन–कलेचा हा निराळाच नमुना लोकांसमोर आला. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात पाश्चात्त्य विद्यापीठातून 'विज्ञानाचे तत्त्वज्ञान व इतिहास' या विषयाचे अध्ययन, अध्यापन व संशोधन या उद्योगाला पुष्कळच महत्त्व आले.

(३)

वरील विवेचनातून हे ध्यानात येईल की, ज्ञानोदयाच्या काळात जी इतिहास–लेखन–कला जन्माला आली तिचा भरपूर विस्तार १९ व्या व २० व्या शतकात झाला. 'यथावत् इतिहास' हे रांकेचे लक्ष्य होते तर काही एक महाकथानक इतिहासातून उलगडत जाते हे हेगेल व मार्क्स यांचे प्रतिपाद्य होते. या दोन भूमिकांच्या दरम्यान इतिहासाच्या नाना परी निर्माण झाल्या. विज्ञानाच्या इतिहासाने वेगळीच वाढ चोखाळली. काही तरी अभ्युपगम किंवा प्रारूप मानून त्याचा पडताळा इतिहासातील विज्ञानविषयक घडामोडीतून मिळतो का, ते पाहायचे ही नवी पद्धती पॉपर, लॅकॅटोस (१९२२–१९७४) व कुन्ह अशा विचारवंतांनी बसविली.

पण या सर्व इतिहास–लेखन पद्धतींनी एक गोष्ट मान्य केलेली होती. ती ही की 'जशी घडली तशी' म्हणून काही हकीकत आहे व तिचा शोध मनुष्याला प्रयत्नपूर्वक घेता येतो. ज्ञानशास्त्रात निःसंशयवादी (जस्टिफिकेशनिस्ट्स्) व संशयवादी (स्केप्टिक्स) यांच्यातील वादाला केंद्रस्थान दिलेले आहे. निःसंशयवादी म्हणतात की निरपवाद किंवा संशयातीत असे ज्ञान असते व मनुष्याला ते प्राप्त होऊ शकते. उलट, संशयवाद्यांचा हेका असतो की, ज्या विषयी संशयाला जागाच नाही असे काही ज्ञान असूच शकत नाही; व समजा असले, तरी माणसाला ते लागू शकत नाही. तीच गोष्ट इतिहासाला जे ज्ञान मिळवायचे आहे, त्याच्याविषयी म्हणता येईल. पारंपरिक विचारसरणी अशी होती की, गतगोष्टींचे यथावत् ज्ञान शक्य आहे व ते प्रयत्नपूर्वक मिळू शकते. या विचाराला आव्हान देणारी एक विचारधारा १९७० सालानंतर पुढे येऊ लागली. या विचार–धारेला 'आधुनिकोत्तर विचार धारा' (पोस्ट मॉडर्निझम्) असे नाव या विचाराच्या अनुयायांनी दिलेले आहे.

साधारणपणे असे मानले जाते की, इतिहास हा खरोखरी होऊन गेलेल्या व्यक्ती व घटना यांच्याविषयी बोलत असतो आणि या जुन्या गोष्टींचे जे काही अवशेष उरलेले असतात त्यांच्या सहाय्याने त्या गत व्यक्ती व घटना यांच्या विषयीच्या हकीकती तयार करणे शक्य असते. इतिहासाची पुस्तके वाचणारी, संग्रहालयांना भेटी देणारी, नाणी–चित्रे–शिलालेख–ताम्रपट यांच्याविषयी जिज्ञासा बाळगणारी जी सामान्य माणसे असतात ती असे धरून चालतात की, विद्वान इतिहास–संशोधक जुन्या व्यक्ती व घटना यांच्याविषयी खात्रीलायक माहिती या सामग्रीच्या आधाराने देऊ शकतात. असेही मानले जाते की आणखी धांडोळा घेतला तर नवीन पुरावे सापडून विशिष्ट गतघटनेची अधिक खात्रीलायक व तपशिलवार माहिती मिळते. विज्ञान ज्याप्रमाणे सृष्टीची रहस्ये उलगडून विकास पावत असते त्याचप्रमाणे इतिहासही अतीतातील रहस्य उकलून सांगतो, नवीन दस्तऐवज प्रकाशात आणतो, ज्याबद्दलची आपली माहिती धूसर व अस्पष्ट होती त्या व्यक्ती व घटना अधिक ठोसर स्वरूपात आपल्या पुढे उभ्या करतो. इतिहासकारांना समाजात जो आदर मिळतो त्याचे कारण सामान्य मनुष्याला त्यांच्या कार्याच्या विश्वसनीयतेबद्दल वाटणारी खात्री हे असते. तथापि 'आधुनिकोत्तर विचारसरणी' ही या समजुतीलाच आव्हान देते.

या आधुनिकोत्तर विचार–सरणीतील टोकाची भूमिका अशी आहे की, इतिहासातील घटना म्हणून काही असल्याच तरी आपल्यापाशी पोचतात ती त्यांच्या बद्दलची फक्त निवेदनेच. (नॅरेशन्स) थोडक्यात सांगायचे तर 'पानिपतचे तिसरे युद्ध' ही घटना आपल्या वर्तमान पिढीच्या दृष्टीने काय असते? तर निरनिराळ्या निवेदनांची केवळ एक चळत. मग त्या ढिगाऱ्यात 'भाऊसाहेबांची बखर', 'भाऊसाहेबांची कैफियत', 'पानिपताची बखर' अशा बखरी असतील; राजवाड्यांना सापडलेले एरंड्यांचे दफ्तर असेल; नाना फडणिसाचे त्रोटक आत्मचरित्र असेल; आणि अगदी अलिकडे लिहिली गेलेली त्र्यं. शं. शेजवलकरांचे 'पानिपत १७६१' किंवा पंजाब विद्यापीठाने तयार

अनुक्रमणिका

केलेले 'मराठाज् ॲण्ड पानिपत' ही पुस्तके असतील. मूळ घटनेशी आपला साधात् संबंध पोचतच नसल्यामुळे या सर्व निवेदनापैकी अधिक ग्राह्य कोणते व अग्राह्य कोणते ते ठरविण्याला विश्वासार्ह मानदंडच आपल्यापाशी नाही. आणि असेच जर असेल तर पानिपताविषयी लिहिलेल्या 'लालन बैरागीण', 'दुर्दैवी रंगू' किंवा अगदी अलिकडे लिहिलेली विश्वास पाटलांची 'पानिपत' ही कादंबरी यांना तरी या निवेदनांच्या चळतीतून का वगळा? थोडक्यात सांगायचे तर आपल्या आजच्या पिढीच्या लोकांच्या दृष्टीने पानिपतची तिसरी लढाई व या निर-निराळ्या निवेदनांचा ढिगारा ही एकत्र होत. या चळतीतील काही निवेदने पूर्वीच्या निवेदनांवर भाष्ये करीत असतात. पण प्रत्येक भाष्य त्या काळातील लोकांनी पानिपताच्या लढाईविषयी जी समजूत करून घेतलेली होती त्या सम-जुतीचे नवीन निवेदनच असते.

अँकरस्मिट या आधुनिकोत्तर विचारवंताने म्हटले आहे की, "एकाच घटनेची दोन निवेदने आपल्यासमोर आली तर आपल्यापाशी 'प्रमाण भूतकाळ' असा काहीच नसल्यामुळे त्या निवेदनांपैकी घटनेशी प्रामाणिक असणारे निवेदन कोणते, हे ठरविणे अशक्य आहे. आपण फक्त दोन निवेदने एकमेकांशी ताडून पाहू शकतो; कोणत्याही वस्तुस्थितीशी ती ताडून पाहायला, ती वस्तुस्थितीच आपल्या हाती नसते. बरे इतिहासकारात जे वाद होतात त्यावरूनही 'भूतकालीन घटना नक्की अशीच घडली होती' असे ठामपणे कोणी सांगू शकत नाही." जेकिन्स या विचारवंताने म्हटले आहे, "इतिहासातील घटनेच्या दोन निवेदनांपैकी एकावर मान्यतेचा शिक्का उठवायला आपल्यापाशी कोणता वस्तुस्थित्यात्मक निकष आहे? .. आज आपण एखादे निवेदन दुसऱ्यापेक्षा जास्त विश्वा-सार्ह असल्याचे मानतो ते केवळ त्या निवेदनाला सध्या या क्षेत्रात अधिकारी म्हणून मानल्या गेलेल्या व्यक्तीने मान डोलावलेली असते म्हणून." ऐतिहासिक सत्य अशी एखाद्या निवेदनाला मान्यता मिळते ती त्या काळातील सत्ताधारी व्यक्तीना किंवा झुंडीला त्या निवेदनापासून काही फायदा उठविण्याची शक्यता वाटल्यामुळे. हे विचार अगदी कडेचे व धक्का देणारे वाटले, तरी त्यात तथ्य आहे, हे कोणासही मान्य होईल.

सर्वत्र आधुनिकोत्तरवादी इतके 'जहाल' आहेत असे नाही; काही जण याहून 'मवाळ' भूमिका घेतात. 'गतकाळ' किंवा 'गतकालीन घटना' म्हणून काही नाहीच असे हे विचारवंत मानत नाहीत. भूतकालीन वस्तुस्थिती म्हणून काही होतीच; पण आपल्यापर्यंत ती पोचते ती मात्र निवेदनांच्या स्वरूपात. पॅट्रिक जॉईस हा विचारवंत सांगतो की, '(गतकालीन) वस्तुस्थिती आणि तिचे निवेदनाद्वारे केलेले वर्णन यांच्यातील भिन्नता आपण मानू शकतो. वस्तुस्थिती ही तिच्या वर्णनाच्या निरपेक्ष अस्तित्वात असते आणि वस्तुस्थितीची तिच्या वर्णनावर काही छाप पडते, असेही मान्य करता येईल. परंतु, हा जो प्रभाव पडतो, निवेदनात जे काही खुलासे किंवा सारासारतेचे विवेचन येते त्यावरूनच कळून येतो.'

आम्हा आधुनिकोत्तरवाद्यांचे इतिहासकारांना आग्रहाने सांगणे इतकेच आहे की, इतिहासकालीन वस्तुस्थिती विषयीची दस्तऐवजी निवेदने, राजकीय हेतूने त्या निवेदनांचा संकल्पनांच्या सहाय्याने केलेला विनियोग (ॲप्रोप्रिएशन) आणि इतिहासकारांनी आपापल्या पद्धतीने रंगविलेले प्रसंग यांच्यापासून ती वस्तुस्थिती वेगळी काढता येत नाही. त्यामुळे (एका विशिष्ट काळातील) संपूर्ण समाजाचे यथासांग वर्णने करणारी महाकथानके (ग्रँड नॅरेटिव्हज्) यांना काहीच वस्तुस्थित्यात्मक आधार उरत नाही.'

'आपण वर पाहिले की, भूतकालीन वस्तुस्थिती म्हणून काही होती व तिच्या विषयी माहिती देणारे अवशेष असतात हे काही 'आधुनिकोत्तरवादी' अमान्य करत नाहीत. भूतकालीन वस्तुस्थितीवर या पुराव्यांच्या आधारे काही खरी–खोटी विधाने करताही येतात. तथापि, इति-हासकार या पुराव्यांच्या आधारे करता येणाऱ्या विधानांची गुंफण वर्तमानकालीन अपेक्षांच्या संदर्भात करत असतात, हे विसरून चालणार नाही. तेव्हा इतिहासलेखनाचा विचार करताना दस्तऐवजी पुराव्यापेक्षा इतिहासकार त्यातील कोणते दस्तऐवज प्रमाण म्हणून निवडतो व त्यापासून एक सुसंगत हकीकत कशी तयार करतो, यावर भर दिला पाहिजे व त्याचे विश्लेषण केले पाहिजे. भूतकाळ काही अमुक एक कथानक उलगडत जावे तशा तऱ्हेने घडत गेलेला नसतो; इतिहासकार त्यावर एखाद्या कथा-नकाचा साचा चोपून बसवितो. म्हणूनच इतिहासलेखना-

विषयी मर्मबंधातली गोष्ट ही आहे की, गतकालीन स्थितीचे सुसंगत वर्णन करताना इतिहासकार जो आकृतिबंध वापरतो तो आकृतिबंधच त्या वर्णनाचा आशयही होऊन बसतो. इतिहासकार सांगत असलेली कथा ही गतवस्तु-स्थितीच्या कोणत्या तरी भागात घडलेल्या घटनेचा अनुकार (किंवा नक्कल) असते व ही नक्कल मुळच्याशी जितकी जुळते तितक्या प्रमाणात ती खात्रीलायक हकीकत म्हणून मान्यता पावते. यामुळेच जी. एम. ट्रिव्हेल्यान (१८७६-१९६२) सारखे जुन्या पठडीतील नामवंत इतिहासकार देखील सर वॉल्टर स्कॉटच्या (१७७१-१८३२) कादं-बऱ्यांना प्रमाण इतिहास-लेखन म्हणून मान्यता देत.

आधुनिकोत्तरवाद्यांपैकी जे 'मवाळ' म्हणावेत अशांची भूमिकाही इतिहास-लेखनाविषयीची जी पारंपरिक समजूत आहे तिला सुरूंग लावणारीच आहे. भूतकालीन वस्तुस्थिती म्हणून काही आहे व ती वस्तुस्थिती तिचे वर्णन करणारी म्हणून जी निवेदने रचली जातात त्या निवेदनांवर काही प्रमाणात छाप पाडते या दोन्ही गोष्टींना मान्यता देऊनही हे मवाळ आधुनिकोत्तरवादी असेच आग्रहपूर्वक मानतात की, या निवेदनांचा उपयोग करून इतिहासकार जो इतिहास रचतो त्या रचण्याला आकार देणारा आकृतिबंध आणि त्या इतिहासाचा आशय यांचा भेद करणे शक्य नसते. थोडक्यात, हा इतिहास देखील इतिहासकाराने रचलेले एक निवेदनच असते आणि पूर्वीच्या निवेदनांपेक्षा या नव्या निवेदनाची पात्रता काही वेगळी नसते, अशा स्थितीत ज्याला इतिहास-लेखन म्हणून म्हणता येईल अशा वाङ्म-याचे कार्य इतकेच उरते की, विशिष्ट 'ऐतिहासिक घटने' विषयी रचलेली जी निवेदने हाताशी असतील त्या प्रत्येक निवेदनामागील निवेदनकर्त्याची भूमिका निवेदनकर्त्याचा काळ, त्याच्या आकांक्षा, त्याचे कर्तृत्व व तत्कालीन बौद्धिक वातावरण यांच्या संदर्भात समजून घ्यावयाची व त्या निवेदनातील वैतथ्य उघडकीला आणावयाचे. यालाच आधुनिकोत्तर वाङ्मयात विरचना (डीकन्स्ट्रक्शन) असे म्हणतात.

आधुनिकोत्तरवादाला बौद्धिक स्तरावर जी मान्यता मिळाली त्याचे, 'इतिहासा'च्या संदर्भातील, कारण असे की, एका अर्थाने त्यांनी 'इतिहासकारा'ला सत्याच्या शोधाच्या जबाबदारीतून मुक्त केले. आधुनिकोत्तरवाद्यांनी असा स्पष्टच आरोप केला की, इतिहासकार भूतकालीन वस्तुस्थिती (पास्ट) आपण केलेल्या वर्तनातून मांडतो व त्यापासून वाचकाच्या पदरात काही ज्ञान पडते, ही समजूत चुकीची आहे; कादंबरी आणि इतिहास यांच्या लिखाणात तत्त्वतः काहीच फरक नाही. दोघेही सत्याचा आभासच निर्माण करीत असतात. भूतकालीन वस्तुस्थिती म्हणून काही असते असे मान्य केले तरी त्या वस्तुस्थितीची असंख्य दृष्टिकोणातून केलेली विविध वर्णने संभवतात. या वर्णनातील खरी कोणती, खोटी कोणती, अधिक विश्वासार्ह कोणती व अविश्वसनीय कोणती हे ठरविण्या-साठी आपल्यापाशी काहीच निकष नाही; कारण त्या भूतकालीन वस्तुस्थितीशी प्रत्यक्ष संपर्क साधण्याचे साधनच आपल्यापाशी नाही. आजवर जो इतिहास रचला गेला तो विजेत्यांच्या दृष्टिकोणातून रचला गेला. आपण पाहिले की, डफ आणि मिल यांनी महाराष्ट्राचा व भारताचा इतिहास रचला व मराठी आणि भारतीय समाज अंध-श्रद्धाळू, अज्ञानी व रानटी धर्म समजुतीत बुडालेले होते; किंबहुना इंग्रजांच्या ताब्यात जायला उत्सुकच होते असे प्रतिपादन केले. महाकथानकी इतिहास सर्व हकीकतींना महाकथानकाच्या दोऱ्यात गुंफण्याचा प्रयत्न करतो. उदा. भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याच्या इतिहासात प्रत्येक स्थानिक लढाही त्या मोठ्या लढ्याचा भाग होता असे भासावले जाते. म्हणजे स्थानिक चळवळी, तात्कालिक उठाव (उदा. मुळशी सत्याग्रह) अशांना या महाकथानकी इति-हासात स्थानच राहात नाही किंवा स्वतंत्र महत्त्व दिले जात नाही. विज्ञानाच्या इतिहासातही असे होते. टॉलेमीचा सिद्धान्त फेटाळून कोपर्निकसचा सिद्धान्त मान्यता पावतो तेव्हा टॉलेमीच्या सिद्धान्तावरही काही उपयोगी उपांगे होती आणि टॉलेमीच्या सिद्धान्तात दुरूस्त्या करण्याची खटपट झाली होती या गोष्टींकडे दुर्लक्ष्य होते. सारांश, आधुनिकोत्तरवादाने इतिहास या संकल्पनेलाच सुरूंग लावला हे खरे असले तरी त्यातून काही उत्तम कल्पना पुढे आल्या हे मान्य केले पाहिजे.

(४)

इतिहासलेखनाविषयी ज्ञानोदय-काळापासून पाश्चात्त्य जगतात काय विचार-मंथन झाले त्याचा आढावा आपण घेतला. इतिहासकालीन काही वस्तुस्थिती होती व तिचा






दस्तऐवजांच्या सहाय्याने कसोशीने शोध घेतला तर ती यथावत् मांडता येते इथपासून सुरुवात करून हे विचार-मंथन आधुनिकोत्तर-वादापाशी येऊन थांबले आहे. इतिहासकालीन वस्तुस्थिती म्हणून काही होती व उपलब्ध दस्तऐवज हे त्या वस्तुस्थितीचे यथातथ्य वर्णन करतात असे पडताळून पाहायला वाव नसला, तरी त्या वर्णनाचा व वस्तुस्थितीचा काही संबंध असतो असे मानण्याला हरकत नाही या भूमिकेवर मवाळ आधुनिकोत्तरवादी येतात, हे आपण पाहिले. या भूमिकेने इतिहासकाराच्या मूलभूत समजुतीलाच धक्का पोचत असला तरी यातून एक फायदा संभवतो. तो असा की, एकाच ऐतिहासिक प्रसंगाची निरनिराळ्या परिप्रेक्ष्यातून तपासणी करायला वाव मिळतो. ऐतिहासिक वस्तुस्थितीविषयीचे सत्य हे एकच आहे व त्याचा शोध इतिहासकाराने घेतला पाहिजे या जबाबदारीतून इतिहासकार काही प्रमाणात मोकळा होतो. त्याच्या प्रतिमेला अधिक मोकळा अवकाश मिळतो.

आपल्यापुढे प्रश्न असा आहे की, गेल्या दोन शतकात इतिहास-लेखनाच्या ज्या वेगवेगळ्या वाटा निर्माण होत गेल्या त्यांचा मराठी इतिहासकारांनी किती उपयोग करून घेतला? इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, वासुदेवशास्त्री खरे, द. ब. पारसनिस, का. ना. साने, दत्तोपंत आपटे, म. म. द. वा. पोतदार, ग. ह. खरे हे सर्व दस्त-ऐवज-शरण इतिहासकार होते. इथे याबद्दल त्यांना दोष देण्याचा उद्देश नाही. कारण मुळातच त्यांच्या इतिहासलेखनाची सुरुवात दस्तऐवजांच्या संग्रहापासून व त्यांचे संपादन करण्यातून झाली होती. पण त्याच काळात न्यायमूर्ती रानडे (व तेलंग) यांनी 'मराठी सत्तेचा उदय' हा कथासूत्रा-धारीत इतिहास लिहिला होता. युरोपातील 'रिफॉर्मेशन'चे प्रारूप घेऊन मराठ्यांच्या इतिहासाचा प्रारंभकाळ त्यांनी रंगवला. त्याचाच आदर्श डोळ्यापुढे ठेवून गद्र्यांनी 'महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग' हा सुंदर इतिहास लिहिला. या दोन्ही इतिहासकारांनी ऐतिहासिक पुराव्यांची संगत न सोडता पण स्वतःची प्रतिभा वापरून गतस्थितीची वाच-काला खात्री वाटावी अशी प्रतिमा उभी केली होती. गतस्थिती नक्की काय होती हे समजण्यास काही मार्ग नाही; तरीही ती काय असावी याचे प्रारूप जाणत्या वाचकासमोर असते व त्या प्रारूपाशी जुळेल अशी प्रतिमा इतिहासकाराने निर्माण केली, तर ती प्रतिमा मान्यता पावते. भारताचा आद्य-इतिहासकार कल्हण याने त्याच्या 'राजतरंगिणी' या इतिहास-ग्रंथात म्हटले आहे.

कोन्यः कालमतिक्रांतं नेतुं प्रत्यक्षतां क्षमः
कविप्रजापतींस्त्यक्त्वा रम्यनिर्माणशालिनः ।।

(रमणीयत्व निर्माण करणारा ब्रह्मदेव व कवी यांच्या खेरीज गत झालेल्या काळाला पुनः डोळ्यांपुढे आणून ठेवण्यास दुसरा कोण समर्थ आहे?) गतकालीन स्थिती प्रत्यक्षात उभी करण्यासाठी उच्च दर्जाची प्रतिभा इतिहास-कारापाशी असावी लागते. नुसती दस्तऐवजांची माहिती असून भागत नाही. दस्तऐवजशरण पण तोटकी प्रतिभा असणाऱ्या इतिहासकाराचा इतिहास 'मराठी रियासती' प्रमाणे प्रभावशून्य होतो. इथेही माझा हेतू रियासतकारांचा अवमान करण्याचा नाही. त्यांनी बहुत परिश्रम केले, नाना कागद गोळा केले, ते कालानुक्रमे व प्रसंगशः लावले आणि बरीच माहिती संकलित केली याबद्दल त्यांना मोठेपणा दिलाच पाहिजे. राजवाड्यांनी इतिहास काही लिहिला नाही; पण त्यांच्या 'महाराष्ट्राचा वसाहत-काळ','महिकावतींच्या बखरीची प्रस्तावना', 'राधामाधव-विलासचंपूची प्रस्तावना' या लेखातून त्यांच्या उत्तम प्रतिभेची झेप ध्यानात येते; त्याचबरोबर कल्पनेच्या या उड्डाणांना वस्तुस्थितीचा काही आधार असेल का, ही शंकाही टोचत राहाते.

पण या जुन्या कथा झाल्या. गेल्या पंचवीस वर्षात नवनवीन संकल्पना पुढे आल्या व त्यांच्या माध्यमातून इतिहास लिहिले गेले. जवाहरलाल नेहरू विद्यापीठातील पंडितांनी भारताचा स्वातंत्र्य-लढा, फाळणी, फाळणीच्या काळातील उच्च-स्तरीय व स्थानिक राजकारण यांच्या-विषयी भरपूर लिखाण केले. बंगाली अभ्यासकांनी 'सबाल्टर्न स्टडीज' या प्रकल्पाखाली अनेक खंड प्रकाशित करून पारतंत्र्याच्या काळात मुख्य स्वातंत्र्य-लढ्यात ज्यांचा समावेश नव्हता अशा अनेक उठावांचा - मग ते राजकीय, आर्थिक किंवा सामाजिकही असतील-परामर्श घेतला. १८ व्या शतकाच्या घडामोडींकडे पाहण्याचा एक नवाच परिप्रेक्ष्य बेली, गॉर्डन, मार्शल आणि केंब्रिज विद्यापीठातील विद्वानांनी प्रचारात आणला. आपण आजवर असे समजत

अनुक्रमणिका

आलो की १८ वे शतक हा हिंदुस्थानाच्या ऱ्हासाचा कालखंड होता. बलिष्ठ अशा मोंगल साम्राज्याच्या विघटनाला या शतकाच्या प्रारंभाला सुरुवात झाली. साम्राज्याच्या सुभेदारांनी आपापल्या स्वतंत्र चुली मांडल्या. मराठ्यांनी हिंदुस्थानभर धिंगाणा घातला. आर्थिक व्यवहारांचा उच्छेद झाला. कलाकार व कारागीर यांना आश्रय उरला नाही व शतकाच्या शेवटी देश इंग्रजांनी ताब्यात घेतला. पण या नवीन संशोधकांनी सावकार, व्यापारी यांच्या व्यवहारांचा मागोवा घेतला, बऱ्हाणपुरासारख्या व बनारससारख्या व्यापारी पेठांतील आर्थिक उलाढाली तपासल्या आणि असा सिद्धान्त मांडला की, १८ व्या शतकात राजकीय उलथा-पालथी काहीही झाल्या असल्या तरी हिंदुस्थानाची अर्थव्यवस्था मजबूत होती. युरोपात ज्याप्रमाणे औद्योगिक क्रांतीच्या आधी व्यापारी क्रांती होऊन भरभराट झाली तशीच स्थिती हिंदुस्थानाची होती. हिंदी समाज हा आधुनिकतेकडे सरकत होता व इंग्रजी राजवटीत जी सामाजिक व धार्मिक सुधारणा घडून आली तिची चाहूल अठराव्या शतकाच लागली होती.

ही सर्व मते आपल्याला पटतील किंवा न पटतील; पण हे मान्य करावे लागेल की या विचारात अभिजातपणा आहे व नव्या वाटा चोखाळण्याचा उत्साह आहे. दुर्दैवाने गेल्या तीस वर्षात आपल्याला असा विस्तृत व चौफेर आवाका असणारा इतिहासकार महाराष्ट्रात झाल्याचे दिसत नाही; किंवा अभ्यासकांचा एक गट काही नव्या दिशेने विचार करताना आढळत नाही. असे होण्याला, अप्रत्यक्ष रीत्या, दस्तऐवज-शरणता कारणीभूत आहे, असे मला वाटते. तुम्ही कितीही दस्तऐवज केवढ्याही कसोशीने अभ्यासले तरी त्यातून तुम्हाला नव्या कल्पना किंवा नवे अभ्युपगम सुचण्याची शक्यता कमी आहे. उलट, अभ्यासकांच्या गटाने आपसात चर्चा करून नवीन संशोधनाची लक्ष्ये ठरवावीत व त्यानुसार दस्तऐवजांची निवड करावी; हे अधिक फायद्याचे ठरणार आहे. दस्तऐवजी पुरावे हा संशोधनाचा कच्चा माल आहे. संशोधकाच्या प्रतिभेतून त्यावर संस्कार घडले तरच भूतकाळाचे नवे व परिपूर्ण रूप आपल्याला मिळू शकते.





अनुक्रमणिका






## साभार पोच

१. *घराघरांचे रूप आगळे :* प्रा. व. बा. बोधे; अक्षरबंध प्रकाशन, 'रविकिरण' नीरा, ता. पुरंदर, जि. पुणे – ४१२ १०२; प्रथमावृत्ती – २००८; पृष्ठे - १४४; किंमत रू. – १३०/-.

२. *कंदिलाचे दिवस :* प्रा. व. बा. बोधे; अक्षरबंध प्रकाशन, 'रविकिरण', नीरा, ता. पुरंदर, जि. पुणे - ४१२ १०२; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे - १५६; किंमत रू. – १४०/-.

३. *मंगलतोरण :* मदन धनकर, हरिवंश प्रकाशन, विद्यानगर, गजानन महाराज मंदिर मार्ग, चंद्रपूर ४४२ ४०१; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – ११२; किंमत रू. ८०/-.

४. *अल्बर्ट आइन्स्टाइन निवडक लेखन :* अनुवाद अविनाश कोल्हे; प्रकाश विश्वासराव, लोकवाङ्मयगृह, भुपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई – ४०० ०२५; प्रथमावृत्ती २००९; पृष्ठे – ९७; किंमत रू. १००/-.

५. *प्रकाशाक्ष :* सुरेश चौधरी, मदन धनकर; परिमल धनकर, हरिवंश, विद्यानगर, गजानन महाराज मंदिर मार्ग, चंद्रपूर – ४४२ ४०१; प्रथमावृत्ती - २००९; पृष्ठे – ११६; किंमत रू.

६. *हिरवे अनुबंध :* दत्तात्रेय नारायण धनागरे; संजय वि. भागवत, मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४०० ००४; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – १२३; किंमत रू. १००/-.

७. *अदृष्ठ :* भारत ससाणे; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई — ४०० ००४; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – १९७; किंमत रू. १७५/-.

८. *वाटा आणि मुक्काम :* आशा बगे, भारत ससाणे, सानिया, मिलिंद बोकिल; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४०० ००४; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – १५४; किंमत रू. १४०/-.

९. *अंतरीचे धावे :* भानू काळे; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४०० ००४; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – २३३; किंमत रू. २००/-.

१०. *अधांतरी :* प्रा. प्रभावती मुठाळ; सुगावा प्रकाशन, ५६२ सदाशिव पेठ, पुणे – ३०; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – २८०; किंमत रू. २५०/-.

११. *प्रत्यंच्या :* शोभा फडणवीस; परिमल धनकर, 'हरिवंश', विद्यानगर, गजानन महाराज मंदिर मार्ग, चंद्रपूर – ४४२ ४०१; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – २८०; किंमत रू. ३००/-.

१२. *लेखसंग्रह तारासूक्त :* तारा धर्माधिकारी; परिमल धनकर, 'हरिवंश', विद्यानगर गजानन महाराज मंदिर मार्ग, चंद्रपूर – ४४२ ४०१; प्रथमावृत्ती - २००९; पृष्ठे – ३१८; किंमत रू. २००/-.

१३. *मंजिल अजून दूरच! :* गंगाधर चिटणीस; भुपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – ४८८; किंमत रू. ३५०/-.

१४. *भारत आणि जग :* गोविंद तळवलकर; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगाव, मुंबई – ४०० ००४; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – ५१३; किंमत रू. ४००/-.

१५. *माझे आशावादी अनुमान :* अनुवाद – सुधा गोवारीकर; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४०० ००४; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – ७७; किंमत रू. १००/-.

१६. *शोध मर्ढेकरांचा :* विजया राजाध्यक्ष; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई – ४०० ००४; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे – २९८;

अनुक्रमणिका

किंमत रू.३००/-.

१७. *इतिहासलेखन मीमांसा :* लोकवाङ्मय गृह, भुपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – २६९; किंमत रू. २२५/-.

१८. *भारत आणि आंतरराष्ट्रीय भू-राजकारण :* लोकवाङ्मयगृह, भुपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई – ४०० ०२५; प्रथमावृत्ती २०१०; पृष्ठे – २०७; किंमत रू. १७५/–.

१९. *मुलांची चित्रकला मुलांची हस्तकला :* डॉ. लता काटदरे; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी गिरगांव, मुंबई – ४०० ००४; प्रथमावृत्ती – २००९; पृष्ठे ८८; किंमत रू. १५०/–.

२०. *महाराष्ट्राचे महामंथन :* लालजी पेंडसे; लोकवाङ्मय गृह, भुपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई – ४०० ०२५; प्रथमावृत्ती २०१०; पृष्ठे – ५९१; किंमत रू. ६००/–.

२१. *संमेलनाच्या मांडवाखालून :* कौतिकराव ढाले पाटील; कैलाश पब्लिकेशन्स, औरंगपुरा, औरंगाबाद; प्रथमावृत्ती – २०१०; पृष्ठे – १७३; किंमत रू. १६०/–.

☆☆☆

---

## लेखकांचा परिचय


❋ **डॉ. राजा दीक्षित**

आंतरशाखीय विद्याभ्यास विभागप्रमुख, पुणे विद्यापीठ, पुणे – ४११ ००७.

***पत्ता :–*** आंतरशाखीय विद्याभ्यास विभागप्रमुख, पुणे विद्यापीठ, पुणे – ४११ ००७. दूरध्वनी : (०२०) २४४७७८३७/ मो. नं. ९७६७७८८९५४

❋ **प्रा. म. शं. वाबगावकर**

मराठी विषयाचे प्राध्यापक (निवृत्त.) नागपूर विद्यापीठ. (त्या काळचे नाव.) 'नवभारता'चे जुने लेखक. प्राचीन मराठी काव्य, तत्त्वज्ञान, इतिहास यांचे गाढे अभ्यासक.

***पत्ता :*** १००२, १० वा मजला, ॲटलांटा हाईट्स्; काका गाडगीळ मार्ग, सिद्धिविनायकामागे, प्रभादेवी, मुंबई – ४०० ०२५. दूरध्वनी : ०२२–२४३६८०२८.

❋ **प्रा. जास्वंदी वांबुरकर**

पदव्युत्तर इतिहास विभाग, एस. एन. डी. टी. महिला विद्यापीठ, न्यू मरीन लाईन्स, मुंबई – ४०० ०२०.

***पत्ता :*** फ्लॅट नं. ८०२, आकृती इरिका, श्रद्धानंद रोड, विलेपार्ले (पूर्व), मुंबई – ४०० ०५७. दूरध्वनी : ९८१९८२४३५३

❋ **प्रा. डॉ. सुमित्रा कुलकर्णी**

इतिहास विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७.

***पत्ता :*** इतिहास विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७. दूरध्वनी : (०२०) २५४४२२७४.




आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

## संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ■ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| ■ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| ■ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| ■ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| ■ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु |
| ■ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु |
| ■ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु |
| ■ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु |
| ■ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु |
| ■ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु |
| ■ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु |
| ■ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु |
| ■ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| ■ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| ■ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु |
| ■ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| ■ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| ■ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु |
| ■ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु |
| ■ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि. के. बेडेकर | ३० रु |
| ■ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु |
| ■ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु |
| ■ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु |
| ■ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| ■ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| ■ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु |
| ■ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| ■ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| ■ पाश्चात्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता :* चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)फोन:(०२१६७)२२०००६

हे मासिक घ. वा. जोशी यांनी के'सागर ग्राफिक्स अ‍ॅण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका